सौष्ठवमाला
**स्त्रीवाहिनी**

पहिली आवृत्ती
जुलै २००४


१६, तपोवन बिल्डिंग, बि. क्र. ५३,
सी विंग, नागरी निवारा परिषद - २,
फिल्मसिटी रोड, मालाड (पूर्व),
मुंबई - ४०० ०२०.
मोबाईल : ९८९२२ २९७३०.

प्रकाशक/मुद्रक
**सतीश पाध्ये**
शब्दवेल प्रकाशन
१३०३, ए, राजघाट रोड,
शिवाजी पेठ, कोल्हापूर - ४१६ ०१२.

मुखपृष्ठ संकल्पना
**श्रीधर तिळवे**

चित्रे
**'काली विजय'** आल्बम पेन्टींग - गुलेर, पंजाब - १८००-२०
**कालीचे शिवप्रेतावरोहण** लोकचित्र - ओरीसा १८०१-१९००
**'सिमुर्ग' पक्षी** (पर्शियन्) - कांग्रा स्कूल - १९ वे शतक

**मूल्य १०० रुपये**

# सौष्ठव कवी : सौष्ठव कविता

सौष्ठव ह्या अनियतकालिकाला दहा वर्षे पूर्ण झाल्यानंतर चौथ्या नवतेच्या संदर्भाचे साहित्य प्रकाशित करण्याचे निश्चित झाले. आमच्या ह्या उपक्रमाला शब्दवेल प्रकाशनाच्या श्री. सतीश पाध्ये यांनी पाठिंबा देऊन हे साहित्य प्रकाशित करण्याचे मान्य केले (त्यांनी ह्यापूर्वीच 'टीकाहरण' हा ग्रंथ प्रकाशित केला होताच.) आणि आज सौष्ठव मालिकेतील हे पहिले पुस्तक प्रकाशित होते आहे. आम्हाला अशी आशा आहे की मराठी रसिक ह्या उपक्रमाचे स्वागत करतील.

'स्त्रीवाहिनी' हा संग्रह ही एका अर्थाने 'क. व्ही. श्रीधर तिळवे' ह्या संग्रहाची पुरवणी (?) आहे. अर्थात तरीही हा संग्रह स्वतंत्रही आहे. ह्या दोन्ही संग्रहातील कविता एकत्र पाहिल्यास एक बऱ्यापैकी पूर्ण चित्र दिसेल असं वाटतं. खरंतर ह्या कविता मी का लिहिल्या ? अशाच का लिहिल्या ? अशा प्रश्नांचं कसलंही समाधानकारक उत्तर माझ्याजवळ नाही. त्यामुळे इथंच थांबतो.

श्रीधर तिळवे

# ऋणनिर्देश


नलिनी तिळवे, शांताराम तिळवे,

अभिजीत देशपांडे,

प्रियवंदा नार्वेकर, कल्पना नार्वेकर,

निनाद / नुपूर काळे,

सुजीत मिणचेकर, राजू जोशी,

जतीन / स्नेहल नार्वेकर,

समस्त तिळवे, नाईक, पानारी परिवार

सतीश पाध्ये

आणि

हा संग्रह प्रकाशित होईपर्यंत ज्यांनी त्यासाठी मेहनत घेतली

ते सर्व.

# अर्पण पत्रिका

सुमंगला तिळवे - नार्वेकर

प्रकाश नार्वेकर (भावोजी)

उज्ज्वला तिळवे

दत्ता तिळवे

भारत तिळवे

भूषण तिळवे

प्रचंड भांडूनही पुन्हा एकत्रच नांदणाऱ्या

ह्या माझ्या भावंडाना

# श्रीधर तिळवे ह्यांचे साहित्य

## प्रकाशित

१. **एका भारतीय विद्यार्थ्याचे उद्‌गार**
(कविता संग्रह) (पॉप्युलर)

२. **टीकाहरण :**
(अर्थात देशीयता : वास्तव आणि आभास)
(समीक्षा) (शब्दवेल)

३. **क. व्ही. श्रीधर तिळवे**
(कविता संग्रह) (पॉप्युलर)

## आगामी

१. **अफेयर डॉट कॉम** (कादंबरी)

२. **मार्गी आणि देशी** (समीक्षा)

३. **चिन्हमीमांसा** (समीक्षा)

४. **परिवर्तनवाद** (वैचारिक लेख)

5. **Conversations On Creativity**

6. **On Globalisation**

# अनुक्रमणिका

## कविता लिहिताना

ही भाषा मेली स्त्रीलिंगीच आहे
तो प्रॉब्लेम नाही
पण ती पुरुषसत्ताक वडाभोवतीच फेऱ्या मारते
आणि जन्मोजन्मी हाच पती मागते
हा प्रॉब्लेम आहे.

तिला कितीदा समजावलं
कविता लिहिणं म्हणजे काही वटपौर्णिमा साजरी करणं नव्हं
परंपरेचं सूत नाकासमोर धरून चालण्यात
कसली आलीये स्त्रीशक्ती ?
पण तिच्या फेऱ्या मारणं सुरूच
आणि पुरुषांच्या पारंब्या पकडून
सूरपारंब्या खेळणंही सुरूच
आता सुरवातच अशी तर शेवट काय होणार ?

म्हणूनच मी आख्खा वडच उलटा करून
कवितेत लटकवून दिलाय

ब्रह्मांड उलटं टांगलं
की स्त्री सुलट होते हा माझा अनुभव आहे

कविता लिहिताना
एवढं शहाणपण ठिकाणावर असलंच पाहिजे की.



## कपडे आणि फॅशन्स

जे सांगायचं असेल ते सहज सांगता यायला हवं
सरळ आणि थेट
भाषा संवाद साधण्यासाठी आहे

संवादात लपण्यासाठी नाही

ज्यांना बाळंत व्हायचे असते
त्यांना कपडे काढावेच लागतात

मी त्वचेविषयी बोलते आहे
आणि तू पुन्हा फॅशनवर घसरलास

माझे नागवेपण सहन करायला शिक
डोळ्यांना एवढी तरी समृद्धी शिकव
किंवा काही क्षण तरी नीट आंधळा हो

मी स्पर्शासारखी आहे
आणि स्पर्शात लपायला जागाच नसते
असायला असते
स्पर्शात ये
आणि अस

ओह शीट !
पुन्हा तुझे कपडे आणि त्यांच्या फॅशन्स



## नग्नता

माझी नग्नता हा सर्वात मोठा धोका आहे तुमच्या संस्कृतीला
म्हणूनच तुम्ही तिला बाजारात उभं केलंय

कुठलंही अध्यात्म कमोडीटी झालं
की कमोडमध्ये फेकायच्या लायकीचं होतं

मी मुक्त नाही

मात्र बायकांचे नागडे देह पाहून फॅशन्स विकत न घेण्याइतपत
मला अवधान आहे

माझे कपडे माझ्या नग्नतेला नेहमीच सूट असतात.



## मी माणूस आहे

मी मार्क्सवादी नाही
पण मी मार्क्स आहे
मी गांधीवादी नाही
पण मी गांधी आहे
मी आंबेडकरवादी नाही
पण मी आंबेडकर आहे
मी स्त्रीवादी नाही
पण मी स्त्री आहे
मी बौध्द नाही
पण मी बुध्द आहे

मी माणूस आहे
म्हणूनच माझे सगळे वाद संपले आहेत.



## गार्बेज

माहिती मृत्यूचे आकलन नाही देऊ शकत
ती मृत्यूविषयी सिध्दांत रचू शकते
म्हणूनच तुझ्या डोळ्यात पाहिलेला आपल्या नात्याचा मृत्यू
माझ्यासाठी आजही रहस्य आहे

त्यावेळी अंगावर उठलेला शहारा

आणि वारा नसतानाही वाहून गेलेले नाते

एक टाचणी पडली
आणि शांततेचा आवाज झाला

किती फुगे फुटले त्याची गणती नाही
फक्त फुटण्याचे आवाज येत राहिले

रात्र झाली तेव्हा फुटलेल्या फुग्यांची प्रेते खोलीभर

सकाळ झाली
आणि कचरेवाली बाई आपल्या नात्याचा मृत्यू
बकेटमध्ये भरून घेऊन
निघून गेली

आजही तिच्या झाडण्याचा आवाज माझ्या कानात खरखरतो
आणि मी तुझ्या आठवणींच्या कचऱ्यात दचकून उठते



## पोहचायचे आहे तिथे

मला प्रवास करायचा आहे तिथून
जिथून रस्ते मॅनेज होण्याचे बंद होतात
आणि डोळे असतात मोकळे
जे असेल ते स्विकारायला
जसे असेल तसे आकारायला

मला पहायचं आहे शेत
जे ना पुरुषाचं असेल ना स्त्रीचं
जिथं जमीन पावसाइतकीच महत्वाची असेल
आणि पिकं करणार नाहीत विचार
बाजाराचा

मला राबायचं आहे तिथं
जिथं मी माळणार नाही फुलं
त्यांना तोडणं हीही हिंसा उमगून
आणि मोकळे सोडेन माझे केस तेव्हा त्यांचा गंध
अगदी जमिनीपर्यंत झिरपेल आणि उगवेलही

मला चालायचं आहे तिथं
जिथं मुक्तपणे फेकून देईन पाण्यात माझ्या ऊंच टाचेच्या सॅण्डल्स,
टंच दिसण्याची सक्ती
आणि चालून चालून आजारी पडलेच तर
मातीतल्या मातीत बरी होईन

मला पोहचायचं आहे तिथं
जिथं मृत्यू पुरुष बनून येणार नाही
आणि मी नाहीशी होईन तेव्हा
परमेश्वर नावाचा परमपुरुष
माझ्या आसपास नसेल



## पहिल्या रात्री

पहिल्या संभोगावेळी मी घाबरून गच्च
कॅमेऱ्यात शूट झालेल्या संगणकाच्या फ्लिकरींगसारखी
माझ्यात फ्लिकरींग अस्वस्थता
तू मात्र ब्ल्यू फिल्ममधल्या स्टडसारखा
शतप्रतिशत कॉन्फिडन्ट

संभोग म्हणजे बेडरुम युतीने
दहा पंधरा अवयवांचं मिळून चालवलेलं सरकार
चाललं तर चाललं
पडलं तर पडलं

हात पडला
आणि मी नशीबासारखी हादरले
मग ओठ
जिज्ञासेच्या सुरीचा थंडगार स्पर्श
मग गरम होत गेलेले हर्ष

कपडे गळत गेले
आणि मीही

एक चिमूटभर स्पर्श माझ्यात प्रकाशगतीने शिरला
मला उजेडाचे झोके देत राहिला
नदीला वल्हवत वल्हवत मी आख्खं वाळवंट पार केलं
आणि जी पाण्यात बसले
ती उठलेच नाही

सकाळ झाली तेव्हा तू निघून गेला होतास
आणि संभोग कलंडून आजूबाजूला सांडलेले थेंब
मी दिवसभर गोळा करत राहिले



## झाड आणि आरण्य

मी फक्त झाड पाहिलं
तर ते उभं होतं
मी फक्त आरण्य पाहिलं
तर ते आडवं होतं

आता ह्या आरश्यासमोर उभी असताना
तू पलंगावर आडवा आहेस
माझ्यासारखी कित्येक झाडे गिळंकृत करून
तू सराईत झालायस

मी आडवी होईन तेव्हाही
तुला कदाचित माझ्यातलं आरण्यच दिसेल
एकमेकात आडवं होऊन सगळं संपल्यावर
तू पुन्हा झाडासारखा उभा राहशील
आणि मला आरण्यासारखी आडवी पाहून कदाचित्
तूही आरश्यासमोर असताना
पुन्हा माझ्यासारखंच फील करशील

मग मीही उभी राहीन
तूही उभा असशील
उभ्या उभ्या निघून जाताना
मी तुला अडवणार नाही

फक्त देहातल्या देहात उभं आडवं होणारं हे नेटवर्क
सगळ्या गाठी नीट बांधून
पुन्हा एकदा आसमंतात भिरकावेन
आणि तू पुन्हा कधी गळाला लागतोस
ह्याची वाट पाहीन

तोपर्यंत तू कुठेही भटक
तू माझ्यात परतेपर्यंत
माझं जाळं सर्वत्र तुझ्या पाठलागावर असेल



## गाणे

आत्मा सतत जळणारा - विझणारा
व्हायोलीनवर वाजवतोय एक नवाच जन्म
पक्षी त [illegible] बसलेला - फसलेला
छेडतोय क्लेरोनेट नवीन झोके घेत
मुलं शाळेला जातायत - वाहतायत
पायांच्या पालखीला एक नवाच साऊंड इफेक्ट देत

रेल्वे पुरवतीये - हरवतीये
एक नवाच रीदम नव्या नव्या नोटला

एक नवीच मुंबई - बिम्बई
कंडकट करतीये एक नवाच ऑर्केस्ट्रा
आणि मी तिच्याबरोबर लिहितीये - गातीये
एक नवीनच सोलो साँग

रुळांचे ट्रॅक्स पोटात घेतायत
आमचा नवीनच साऊंड
काळाच्या नव्या स्टुडिओत
रेकॉर्ड होतय आमचं नवीनच गाणं

फक्त माणसांची गर्दी
नेहमीप्रमाणंच बहिरी आहे.



## झाड

मी तुला मिठीत घेतलंच नाही
मी झाडाला मिठीत घेतलं
मला एकदम हिरवंगार झाल्यासारखं वाटलं

मग तू काहीतरी बोललास
ते मी कानांनी टिपलंच नाही
मी फक्त पानांची सळसळ टिपली

मग तू माझ्या आत आलास
पण मी तुला पाहिलंच नाही
मला फक्त फांद्याफांद्यातून वारं पिसाटल्यासारखं वाटलं

मग तू एकाएकी शांत झालास

पण मला ते कळलंच नाही
फक्त पानं थकल्यासारखी त्वचेवर गळतायत एवढंच जाणवलं

तू निघून गेलास
पण मला पायरव ऐकूच नाही आला
फक्त एका पुरुषानं झाड कापून
ज्या ट्रकात भरलं
त्याच्या निघण्याचा माझ्यात आवाज झाला



## स्कायडायरी

एक राक्षस माझं काळीज खायला येतो
आणि मला ते माहीत असूनही मी त्याला ते वाढते

त्याचे डोळे असतात नेहमीच भुकेलेले
आणि स्पर्श आगीला खेळवणारे

तो मला उभ्याउभ्याच जाळणार हे मला माहीत असते
आणि तरीही मी त्याच्या स्वागतासाठी माचीस घेऊन

त्याच्या मांड्या मलखांब असतात
त्याचे बाहू नागाचे सरपट डंख

तो डसणार हे मला माहीत असते
आणि तरीही माझ्या स्तनांचे तोंड
सूर्यफुलासारखे त्याच्याकडे वळते

तो सूर्यासारखा माझ्या ओठात उगवतो
सूर्यासारखा माझ्या योनीत मावळतो

आणि मी तो एक दिवस त्याच्या खाती टाकून

माझ्या शरीराची स्कायडायरी बन्द करते



## दारू

जिज्ञासेने घेतली मी दारू थोडीशी
पुरुषांची जात झाली वेडीपिशी

म्हणे काय बाईच्या जातीला शोभते
बघू आता झोपते की नशेत चालते

पडत गेली माझी बदचाल वाकडी
उडू लागल्या वावड्या ही झाली बेवडी

तरंगत तरंगत झाला माझा ढग
मलाही चढली पुरुष होण्याची रग

तिथे आला कळून दारू पिण्यातल्या धोका
गुरगुरायला लागला माझ्यात एक बोका

मांजरीसारखे आता डोळे मिटून घेते
पुरुषासारखी आता दारूही नाकारते

बाटलीतल्या बाटलीत पहाते त्यांचे बण्ड
नशेत क्रांतिकारक शुद्धीत मात्र थण्ड



## बुडबुडा

बुडबुडाच जेव्हा लागला भासू ईश्वर
पाणीच वाटू लागले नदीला नश्वर

मिसीसीपी असो वा असो कुणी गंगा
कुठल्याही पाण्यात बुडबुडा नंगा

बुडबुड्याची पुरुषी जातीवंत काच
नदीला म्हणे तू माझ्यातच नाच

नदीने कसे बुडबुड्याचे ऐकावे
त्यापरीस म्हणे बुडबुड्यानेच फुटावे

त्यासाठी केली मी आयुष्याची टाचणी
किती बुडबुड्यांना दिली मी फोडणी

पाण्यामध्ये मुक्त वावटळत गेले
उताणी काय वाहिले सगळे पुरुष मेले.



## कामाठीपुरा

चन्दु नेहमी म्हणायच्या
रांड नेहमी बदसूरत असावी
म्हणजे ती जास्त सुख देते

श्रीधर नेहमी म्हणायचा
मी रांडांचा हात पाहीन
पण मी त्यांना विकत घेणार नाही
ह्याला तुम्ही माझी नैतिकता समजा
किंवा आणखी काहीही

बाळकृष्ण म्हणायचा
तिथं जाऊन आलो
आणि संगीत पुरं झालं

मी मात्र काहीच म्हणायचे नाही
मला माहीत होतं
ह्या साऱ्यांचा कामाठीपुरा माझ्यापासूनच सुरू होतो.



## संभोगातून समाधी

संभोग समाधीपर्यंत पोहचत नाही
माणूस संभोगातून समाधीत पोहचू शकतो
फक्त त्याला दोन गोष्टी जमायला हव्यात
पहिली
त्याला संभोगातून चालता यायला हवं
दुसरी
संभोगातून चालताना
त्याने तो मनाला लावून घेता कामा नये

माझ्या मनात तुझ्या देहाच्या कित्येक शतपावल्या
ठाण मांडून आहेत
आणि तुझी समाधी
मी अशी अगतिकपणे
माझ्या मनात बसून पाहतीये.



## भविष्यवेत्ता

भविष्यवेत्त्याचं नशीब कोमेजत चाललंय माझ्यासमोर
माझा हात थरथरत नाहीये
माझी पाचही बोट स्थिर आहेत
आणि भविष्यवेत्ता शोधतोय परंपरेनं माझ्या हाताला जोडलेलं
सहावं पुरुषी बोट
तो करतोय उलट सुलट माझा हात

पण ते त्याला कुठंच दिसत नाहीये
तो कन्फ्यूज झालाय
सहा बोटांची बाई बघण्याची सवय झालेले त्याचे डोळे
माझ्या नजरेत कोसळून पडलेत
आणि मी त्याच्या डोळ्यांतील सारे स्पीड ब्रेकर करत सपाट
माझ्या कर्तृत्त्वाची मारुती अफाट
वेगाने हाकतीये.



## आत्मविश्वास

मला तुझ्या कॅमेरामधील मॉडेल व्हायला आवडेल
मात्र मी तुझी कमर्शिअल होणार नाही
मला आवडेल मी इतरांपेक्षा वेगळी असलेली
कॅमेऱ्यात सगळी ठसलेली
मला आवडेल माझ्या त्वचेचा कॅमेऱ्यापर्यंत झालेला प्रवास
किंवा तू मला न्यूडच शूट करणार असशील तर
तुझ्यापुढे माझा सगळा देह
इन्स्टॉलेशनमध्ये मांडायलाही मला आवडेल
फक्त अट एकच
शूट करताना तूही माझ्याइतकंच नॅचरल असायला हवं
माझी नैसर्गिकता क्वेश्चन नको करूस
निसर्ग माझ्यापासून सुरु होतो
हा माझा आत्मविश्वास नाही
ते सत्य आहे मला कळलेले
शूटींग न करताच माझ्यात वळलेले.



## भीक

माणसांना चोरी करायची नसते
म्हणून माणसे भीक मागतात

किंवा माणसांना चोरी करायचेही कष्ट करायचे नसतात.
म्हणून माणसे भीक मागतात.

बायकांना नवऱ्याचे ऐकावेच लागते
म्हणून बायका भीक मागतात
किंवा बायकांना नवऱ्याचे ऐकायचे नसते
म्हणून बायका भीक मागतात

भीक ही एक पॉलिटीकल गोष्ट असते
तिच्यात बाई कधी सुरू होते कधी माणूस
तेच कळत नाही

भीक अंधुक असते
बाईच्या अस्तित्वासारखीच
म्हणूनच बहुतांश भिकारी अंधुक असतात
त्यांची दुनिया अंधुक असते
त्यांना तेवढेच दिसते
जेवढे भीक त्यांना दाखवते

भिकेला काय आणि किती अंग दाखवायचे
ह्याचे कॅब्रेडान्सरसारखेच
प्रोफेशनल भान असते

ती तेवढेच अंग दाखवते
जेवढे दाखवणे पुरेसे असते
ती तेवढेच अंग पेटवते
जेवढे पेटणे आवश्यक असते

बाकी उरलेले अंग भीक
बाईच्या एक्सपोज न झालेल्या अंगासारखे
गुलदस्त्यातच ठेवते



## आश्वासन

जमिनीवर झोपलास
की हमखास पाठ धरायची
म्हणून तू भीमासारखा
जमिनीला पाठ न दाखवता
खाटेवरच स्वत:ची झोप अंथरायचास

माझ्या जमिनीवरच झोप अंथरून
पाय पसरण्याच्या सवयीला
तू म्हणायचास स्त्रीशक्ती
आणि आख्खं पुरुषपण गालात ठेवत
गालातल्या गालात हसायचास

मी जमिनीवर मांडी घालून कशीही बसले की
तू कडाडायचास
अशी अंडी काय उबवत बसलीयेस
योग्याने कसे ताठ असायला हवे
अन्यथा योग ही माठच होतो

पतजंलीची योगसुत्रे शिकवताना
काहीतरी उकलत गेल्यासारखे तुझे डोळे
स्वत:चा देह पाहून उदास हसायचे

अंगभर त्वचेच्या खाली नरकासारखा तळपणारा सोरायसीस
पाठीवर एका मारामारीत बॅटचे बसलेले विखारी तडाखे
दोन्ही कानांचे बहिरे झालेले आखाडे
आणि वासाची ओळख गायब झालेले नाक

आयुष्याकडून संपूर्ण पराभूत झालेला तू
मला फार फार उशीरा कळलास

आता तू आठवणीत फळलास

की डोळ्यातलं पाणी खळंत नाही

सगळं सोसून निर्विकार झालेला तुझा चेहरा
(तू आयुष्य जगला नाहीस सोसलास )
मी मख्ख समजायची
आणि आता त्याच्या 'आड' चा तू कळलायस
तर माझ्याजवळ पोहराच नाही

मी तुझा एकमेव शिल्लक असलेला फोटो
उदासपणे पाहतीये

माझ्याजवळ त्याची निगेटीवही नाही
ह्या विचारानं धसकून जाऊन
मी त्याला प्राणापलिकडं जपतीये
आणि टवके उडत चाललेला तो फोटो
माझ्या बरोबरच जीर्ण होत चाललाय

मी त्या फोटोआधी मरेन
एवढंच आश्वासन
आता मला आयुष्याकडून हवं आहे.



## साक्षात्कार

स्वत:लाच साक्षात्कार झाल्यासारखं
स्वत:चंच खुजेपण
हे महावृक्ष होण्याचं बीज कुणी पेरलं
कुणी ओवलं हे वर्ल्डफेमस होण्याचं मळसूत्र गळ्यात
स्वत:चंच कंडिशनिंग ऐकत
बहिरं होण्याची वेळ आलीये
आणि हा भोवताली
माध्यमांचा जागतिक थयथयाट

ती मित्र की शत्रू
हेही ओळखू येत नाही आताशा
फक्त मुक्त होण्यासाठी
ती उपयोगाची नाहीत
एवढंच कळून चुकलंय

एक कण्टाळा पसरलाय आयुष्यात
इतका की
जगण्याची जीभ टाळ्याला न चिकटता
कण्टाळ्याला चिकटते
आणि कंडिशनिंगचा पोलिओ लहानपणीच होऊन
लुळी झालेली भाषा
मुक्ततेचा बनाव रचत
कवितेतच सरपटत राहते.



## पुढील जन्मात तरीही

पायापासून माझ्या सुरू होते आयुष्य
देहामध्ये माझ्या थांबून राहतो मोक्ष
जो काही सत्याचा लागणार असतो सोक्षमोक्ष
तो माझ्या देहातच लागणार असतो

पुढील जन्मात तरीही वक्ष माझा वाकतो.



## टीप

माझ्या चिन्हांना माया म्हणून
मला वाऱ्यावर सोडून देता येते

प्रत्यक्ष तर माझ्या श्वासात
माझ्याइतकेच वावरत असते
खरी चिंता माझे अनुमान आहे

ते सत्याची मान ताठ ठेवू शकते
किंवा सत्याची मान कापूही शकते
त्याला कधीही हवा लागू शकते
किंवा त्याची कधीही आबोहवा होऊ शकते

म्हणूनच मी त्याच्यासाठी एक हवामहाल बांधून दिलाय
ह्या वाळवंटात
तिथे एक खोली खास माझ्यासाठी राखीव आहे

मी तिथे गेले की
माझ्या गेस्ट ॲपीअरन्सची देखभाल
तिथे उत्तम राखली जाते

माझे आयुष्य तिथे शहाण्यासारखे वागते
वादळासारखे जगते

माझ्या कविता ह्या मी त्या खोलीत असताना
अनुमानाला दिलेली टीप आहे.



## मीच

तू आयुष्याला घाबरलायस
तू मृत्यूशी मुकाबला करण्याची योजनाही आखतोयस

मी त्या मुकाबल्यात सामील होत नाही ह्याचं तुला दुःख
पण मी काय करू

मृत्यू ही केवळ कल्पना आहे माझ्यासाठी

मी फक्त आयुष्यातच असू शकते
आणि आयुष्य आहे इथे आणि आता

मी इथे आहे
मीच आयुष्य आहे



## शिडी

ब्रह्मांडात सर्वत्र पसरलेले पोस्टमॉडर्न विषाणू
त्यांचे लोकल देह त्यांची नेटीव रचना
आणि ह्या ग्लोबवर जनेटीक ग्लोबलायझेशन होऊन
जन्माला आलेला हा तुझा माझा मल्टीनॅशनल बहुपेशीय जीव

आपल्या आनंदानं जगण्याची स्पॉन्सरशीप मिळालीये
आणि तरीही दुःखाचं प्रक्षेपण करणारी तुझी तृष्णामग्न प्रणाली
तुझ्या हालचालीतून फक्त दुःखच प्रक्षेपित करतीये

शिखरांना मुसक्या बांधून दऱ्यात खेचता येत नाही
सत्य कधी अवतार बनून वरून अवतरत नाही

म्हणूनच मी व्हर्टिकली आनंदानं चढतीये
आणि तू हॉरिझंटली ऐसपैस मैदानासारखा फाकलेला

तुझ्या माझ्या देहात एका क्रॉसवर्डची शिडी आहे
आणि मी अनावर आनंदानं
संभोग चढत चाललीये.



## दुरून

तू पुरूष आहेस त्यात पुन्हा ब्राह्मण
कितीही जवळ आलास तरी
मनुस्मृतीसारखाच वाटत राहशील
एक कर
मला दुर्बिण आणून दे
म्हणजे मी तुला रिमिक्स गाण्यातल्या मॉडेलसारखी
फक्त दुरूनच पाहीन
आणि यदाकदाचित तुझं आकर्षण वाटलंच तर
चेकाळून जाऊन ऑरगॅझम डिसचार्ज करून मोकळी होईन

वाईट नको वाटून घेऊस
पण हल्ली डोंगर
दुरून साजरे करण्याचेच दिवस आलेत



## अन्न

अन्न माझा आरसा आहे
मी लख्खपणे पाहू शकते त्यात स्वत:ला
म्हणूनच परस्परसंबंधांची थाळी चकचकीत ठेवते
तुला हवं असतं स्वत:च व्यक्तिमत्व
आणि अन्न आणि तू ह्यांच्यात भिंत उभी राहते

मला पाण्यात माझे रक्त वाहताना दिसते
फळात माझे स्तन

तुला फ्रीजमध्ये आख्खं फास्ट फूड कल्चर
टिकवण्याचा हव्यास जडलाय

मी अन्नात माझा वास हुंगते

तेव्हा तू मी वाढलेल्या थाळीत
आयुष्याचं अत्तर शोधत असतोस

ही पृथ्वी माझ्यासारखीच अन्न तयार व्हावे म्हणून
ऋतू बदलत असते
आणि तू वेळेवर जेवण्यासाठी
घड्याळ शोधल्याच्या आनंदात सर्वत्र लटकत असतोस
घड्याळे रिपेअर करुन करूनही
तुझ्याकडे खाण्यासाठी प्रचंड मोकळा वेळ
आणि मी ही अशी स्वयंपाकघरात वाढत जाणारी बाई

तू टीव्ही पहात फास्ट फूड फस्त करत असतोस तेव्हा
मी मुलाला भरवत म्हणत असते
एक घास काऊचा
एक घास चिऊचा

तू मॉनिटरवर लाखी डाळीने आंधळा झालेला असतोस तेव्हा
मला घरगुती अन्नात मी स्वच्छ दिसत असते.



## महाभारत

हे शरीर किती संभोगाच्या पानांनी बनलंय
३६५ ?
१००० ?
२००० ?

लिहून लिहून अंग थकून गेलंय
आणि हे महाभारत संपतच नाही

प्रत्येक वेळी नवे पान लिहिण्याची असोशी
आणि प्रत्येक वेळी मृत्यूची वाळवी लागल्याने

कोणत्याही क्षणी लेखन नाहीसे होण्याचे भय
मी लिहितीये
आणि पोखरलीही जातीये

मी आजकाल वारुळासारखी दिसतीये
त्याचं रहस्य हेच आहे



## हत्तीण आणि आंधळे

हत्तीण उडाली आकाशी
तिचे लक्ष्य आंधळ्यांपाशी

अजूनही माझ्या शरीराचे अवयवच चाचपणारे आपले सहा कुटुंबमित्र
आणि मी मातृत्वातून आकाशात घेतलेली ही हनुमानउडी

साऱ्या पृथ्वीवर पसरलाय पुरुष गुरुत्वाकर्षणासारखा
किंवा गुरुत्वाकर्षण पसरलंय पुरुषासारखं
माझं प्रत्येक फळ त्यामुळं खालीच पडत चाललंय
आणि प्रत्येक क्षण न्यूटनसारखा गुरुत्व कॅलक्युलेट करत बसलाय
माझ्या काळजाचा चन्द्र फिरतो आहे
कॅलक्युलेट झालेल्या पुरुषी तिढ्यात
मी उसळवते आहे आकाशातून
कॅलक्युलसमधून एस्केप होत
तुमच्या पुरुषी काळजावर अवधानाच्या स्त्रैण लाटा
आणि तुम्ही सातहीजण रक्ताची भरती ओहोटी
ही रोजचाच तमाशा असल्यासारखी पहात
दारू पिऊन उभे स्वत:च्याच काळजात

ना तुमचे स्वत:तील हत्तीकडे लक्ष्य
ना तुम्हाला स्वत:ला डोळस होण्याची इच्छा

तुमचे हे आंधळेपण
आकाशातही माझ्यावर तलवारीसारखे लटकते आहे
आणि मी माझी मान वाचवत
तुमच्यातील अदृश्य हत्तीकडे संपूर्ण पहात आहे

मला उमगत चाललंय
तुम्ही हत्ती आहात
आणि आंधळेही आहात
हा तुमचा दोष नाही
मी स्विकारत चाललीये
मी हत्तीण आहे
आणि चक्रधरही आहे
ही माझी कुवत आहे



## दिलासा

वीज पुन्हा एकदा निघून गेलीये
आणि मी टीव्ही सोडून तुला
भाषेत शोधत बसलीये

तू अभिनेता नाहीस
हा दैवदुर्विलास आहे की भाषेचा चिद्‌विलास
मला माहित नाही
पण वीज गेली की तू
हमखास आठवतोस
अंधारात टीव्ही उभाच राहू शकत नाही
भाषा उभीच का पळूही शकते
हे भाषेचे प्रकाशबळ आहे
आरसा म्हणून काहीच वर्कआऊट होत नाही आजकाल
पूर्वी पाणी उपयोगी पडायचं आम्हा बायकांना
आजकाल तेही इतकं प्रदूषित की

त्याची शुध्दता बाटलीत बन्द
कमोडीटी बनून
जी काहीच दाखवत नाही ह्या चन्द्रप्रकाशात
मी शृंगार करून बसलीये
आणि मला माझा चेहरा दाखवणारे तुझे शब्द
गायब आहेत
ह्या फिक्या चन्द्रप्रकाशात
हे असं आंधळेपण स्वीकारणं
जिकरीचं होत चाललंय
भाषेत चालत जाताना
स्वत:शी बोलत जाताना
तू नाहीस
तुझ्या कविता नाहीत
तुझं शब्दांनी पाहणं नाही
की माझं मला दिसणंही नाही

फक्त माझं शरीर माझ्या स्पर्शाला कळतंय
एवढाच दिलासा
ह्या जिवंतपणाच्या काळोखात आहे



## खूप खाली कोसळताना

खूप खाली कोसळताना
पुन्हा मांजरासारखं सुलटं उभा राहता आलं
की जिंकल्यासारखं वाटतं

आयुष्य वासनेपासून सुरु करता येतं
आणि मोक्षापासूनही

फ्रॉईड वाचून बापाशी रत होता येतं

आईशी अविरत होता येतं
आणि विवेकानंद वाचून नवऱ्यातही मुलगा पाहता येतो
बायकोत कुंडलिनीची कुंडलाई

खूप खाली कोसळताना
वर पाहता येतं
खालीही पाहता येतं
खूप खाली कोसळताना
कोसळणंही पाहता येतं

खूप खाली कोसळताना
कोसळणं पाहताना
डोळे खोलवर न्हेईन
आणि लख्ख उजाडेल

खूप खाली कोसळताना
आता फक्त त्या
खोलीची प्रतिक्षा आहे



## उत्खनन

मिळालेला नवरा नाण्यासारखा उधळला
आणि छापा की काटा
ह्याची प्रतिक्षा करत राहिले

एक दिवस हवाच फ्रीज झाली
आणि नाणं उभ्या उभ्याच
पुराणवस्तूसंग्रहालयात दाखल झालं

आता कधीमधी संसाराच्या उत्खननाचे आवाज ऐकू येतात
आणि मी इतिहासकारासारखी

स्वत:लाच रचत बसते

माझ्या घरात स्वनिर्मित नवऱ्याचे ढीगच्या ढीग पडलेत
आणि मी हे सगळं
आमच्या साडेपाच फुटी देहांनी घडवलंय
ह्या विचारानेच अचम्बित आहे



## क्रॅकजॅक

प्रत्येक बाई सारखाच विचार करते

नवऱ्यानं आपल्या शरीराचं मीठ खाल्लं आहे
त्यामुळे तो आपल्या शरीराशी इमानच राखील

मलाही पहिल्या रात्री शरीर मीठासारखंच जाणवलं
आणि रात्र चढत गेली तशी त्याची साखर झाली

वर्ष गेलं
एकमेकात तिळगूळ वाटत
आणि एकदिवस संक्रांत आली
आणि जाणवलं
तुझं शरीर मिठाचे दोन दोन ब्रॅण्ड बाळगून आहे
एक माझा
एक तिचा

मग आयुष्यच कालांतराने खारट होत गेलं

आता माझी सवत
तुला पोटभर शरीर खायाला घालत असेल
आणि मीही अशी तुझ्या मित्रासोबत

त्याची साखर डायबेटीसी आहे
हे कळून सवरून

त्याच्या नग्न शरीरात
मला साखरेचे कित्येक ब्रॅण्ड दिसतायत
आणि मी आला दिस गोड करत
आपल्या बेडरूमचं गोडाऊन करत चाललीये

तू संध्याकाळी येशील
माझ्या बोलण्यात जमलेल्या मुंग्यांवरून
साखरेची चाल ओळखशील
आणि रात्री माझ्या पाठमोऱ्या देहाकडे उदास पहात
तिच्या मिठात विरून जाशील

गेल्या कित्येक रात्री ह्या अशा क्रॅकजॅकच्या चालल्यात



## आत्महत्त्येच्या तळ्यात

आत्महत्येच्या तळ्यात तळात जाऊन बसण्याची माझी सवय
तशी जुनी आहे

प्रत्येक कुरुक्षेत्रावर पानिपत ठरलेले
प्रत्येक चक्रव्यूहात आयुष्य हरलेले
एका जुन्याच युध्दाची नवीन ओळख करून घेताना
एका नवीन रॅटरेसमधून काढता पाय घेताना
मृत्यूत आराम करण्याची खोड
माझ्यात मुळापासून आहे

मी मरत नाही
मी आत्महत्येची रोज प्रॅक्टीस करते
जगण्याची वकिली करणारी बाई

माझ्यात अद्याप जिवंत आहे
जी आयुष्याची केस अद्यापही लढवतीच आहे

तिला मरायचे नाहीये
फक्त मृत्यूशी डोळे भिडवून
तिला माझ्या भयाचा नंबर कमी करायचा आहे
मला खात्री आहे
कधीतरी ती मृत्यूला संपूर्ण पाहील
आणि स्वत:लाच नवा जन्म देऊन
ह्या आत्महत्येच्या पिपासेतून मला
कायमची मोकळी करेल

तोवर ह्या आत्महत्येच्या तळ्यात
आत्महत्येच्या सौंदर्यसाबणानं
मला रोज अशीच आंघोळ करू दे.



## बायका

बायका आजकाल आयुष्य असेम्बल करायला लागल्यात
त्यांना वाटतं की
पुरुषांच्या मल्टीनॅशनल्सशी फाईट करण्याची
हीच सुसह्य रीत आहे
त्या सहनशील झाल्यात
आणि स्वस्तही
त्या स्वत:चं मार्केटींगही करायला शिकल्यात
आपली बॉडी हवी तशी मोल्ड करायला शिकल्यात
त्यांचे बांधेसूद बांधे
पुरुषांना घाम फोडतायत
आणि बायका पुरुषांनीच शोधलेली सौंदर्यप्रसाधनं लावून
स्वत:ची त्वचा नितळ ठेवतायत

पुरुष बायकांसाठी सौंदर्यस्पर्धा ठेवतायत
त्यांना वाटतंय की
बायकांना सौंदर्यात गुंतवलं की
त्याचं पुरुषांच्या कुरुपपणाकडं लक्ष्य जाणार नाही

पुरुषांना स्वत:च्या रंगाचा उंचीचा शरीराचा
भयंकर कॉम्प्लेक्स आलाय
आणि बायका जगभर केस उडवत
स्वत:च्या सौंदर्याचं ग्लोबलायझेशन करतायत

बायका दिवसेन्‌दिवस सर्वत्र पसरत चालल्यात
त्यांना माहिती आहे
त्या जिंकताहेत
आणि पुरुष ते हरतायत हे न ओळखता
बायकांच्या विजयाचं मार्केटींग करतायत

बायका धूर्तच आहेत नेहमीप्रमाणं
त्या पुरुषांना काहीच जाणवू देत नाहीयेत
आणि पुरुष सगळं जाणतायत ह्या अंहकारात
बायकांच्या पोटात नवा जन्म घेण्यासाठी उभे आहेत



## ऑक्सिजन

(जोसेफ प्रिस्टले, अँटोनी लॅव्हॉयझर आणि कार्ल शीले ह्या प्राणवायूच्या (ऑक्सिजन) तीन संशोधकांना)

तिघांनी प्राणवायू शोधला मांडला
एकाला धर्माने इंग्लंडहून अमेरिकेला मायग्रेट केला
दुसऱ्याला फ्रेंच राज्यक्रांतीने गळ्यामधून कापला
आणि तिसरा

संशोधनासाठी सायनाईडची संयुगे खाऊन उपेक्षित मेला

तेव्हापासून प्राणवायू रक्तलांच्छित आहे
तरीही माणसात रक्त तयार करण्याची जबाबदारी
त्याने सोडलेली नाही

त्याचा माणसावर विश्वास आहे
माझ्याप्रमाणेच

मी श्वास घेत असते
तेव्हा माणसावर विश्वास दाखवत असते
माझी माणुसकी ही अशी प्राणवायूवर आधारीत आहे
मला खात्री आहे
ती प्राणवायूइतकीच भरभक्कम आहे.



## श्रीधर

श्रीधर मला आवडतो
कारण तो महाशॅव्होनिस्ट आहे
आणि तसाच कवितेत दिसतो

दिलीप मला आवडत नाही
कारण तो शॅव्होनिस्ट आहे
पण कवितेत तसा दिसत नाही

मी श्रीधरला सुधारू शकते
दिलीपला तो सुधारलाय
अशी पक्की खात्री त्याच्या कवितेने पटवलीये

मी श्रीधरशी बोलू शकते
दिलीप आणि मी ह्यांच्या दरम्यान

दांभिकतेची चायनीज वॉल आहे

मी त्या पोयेटीक वॉलवर जाऊन
फारतर मॉलशॉपींग करू शकते
श्रीधर बरोबर मात्र मी एका घरात राहू शकते



## सहवास

मी काहीवेळा पिकते
काहीवेळा पकते
मात्र दोन्हीवेळा माझ्या अंगाला जो वास येतो
तो तुझाच असतो

तुझा सहवास
हा असा माझ्या आत
झाडासारखा फळलाय



## प्रतिक्षा

कविता लिहिणंही बोअर वाटावं
असा हा इनडोअर मौसम
ना फुले
ना फळे
ना वृक्षवल्ली सगीसोयरी
सगळं घर प्लॅस्टीकचं झालंय
आणि फ्लॉवरपॉटमध्ये गुलाब बसावा
तशी बसलीये मी ह्या घरात

माझ्या सुगंधाला प्रतिसाद नाहीये

माझ्या साडीत पाडापाडी नाही
ह्या ब्लाऊजला अंगावेगळी होण्याची घाई झालीये
आणि ज्याच्यापुढे कपडे काढून
फिलॉसॉफी डिस्‌कस करावी
असा पुरुष आसमंतात नाही

सारे कसे फक्त त्वचा चाटत जातात
जणु बाई म्हणजे चाट मसाला
आणि हे म्हणजे नुस्ते जीभ

मी ह्या इनडोअरमध्ये कधीचीच एकटी बसलीये
आणि माझ्या घराची साधी डोअरबेलसुद्धा वाजत नाहीये



## व्हर्टीकल

प्रत्येक प्रवास शेवटी केऑसला जाऊन मिळाला
प्रत्येक ऑर्डर शेवटी डीसऑर्डरकडे नोंदवली गेली
प्रत्येक भटकंती होम डिलिवरीसारखी
माझ्याच पायाकडे चालत आली

आता शेवटी चालून चालून
मी आयुष्याच्या आडव्या तिडव्या Rhizomes मध्ये
थकून भागून बसलीये तर लोक
मी डेल्यूझसारखी व्हर्टिकल आत्महत्या केलीये
असं पुटपुटत माझ्या आसपास उभे आहेत
आणि मृत्यू माझा पंचनामा करून
मला पुनर्जन्म देण्यासाठी
परमेश्वराच्या गॉथिक पोलीस ठाण्यात स्वत: गेलाय

तो परत येईपर्यंत तरी

मला असं प्रेतासारखं आडवंच पडून रहायला हवं



## कवचकुंडलं

जे हवेने मागितले ते हवेला दिले
श्वास शेवटी हवेचेच होते
जे आगीने मागितले ते आगीला दिले
शेवटी स्पर्श आगीचेच होते
जे मातीने मागितले ते मातीला दिले
शेवटी अन्न वस्त्र निवारा मातीचाच होता
जे पाण्याने मागितले ते पाण्याला दिले
शेवटी रक्त आणि घाम पाण्याचेच होते

आता शिल्लक राहिलाय तो माझा मृत्यू
तो न्यायला आकाश कधी येतय ह्याची वाट पहात मी
ही कवितेची कवचकुंडलं उबवत बसलीये.



## खोटं

सगळं आयुष्य खोटं करून टाकलंय मी
हाताची पाचही बोटं कधी सारखी नसतात
तशी मीही
कधी करंगळी
कधी मध्यमा
तर कधी नुसता अंगठा होत

कधीची वाट पाहतीये
आयुष्य कधीतरी सत्याचा एकसंध हात होईल म्हणून
पण बोटं काही जुळून येऊन

तळहाताला टेकत नाहीत.

तळहातावरच्या टेकड्या वाट पाहून पाहून थकल्या
पण सत्याचं साधं पिलूदेखील कधी त्यांच्यावर चढलं नाही
बोटातल्या बोटात झिरपत राहिले भ्रम
आणि भाषा झाली इमेज प्रोजेक्ट करणारी कमर्शिअल वाहिनी

जोपर्यंत पकडली जात नाहीये तोपर्यंत सगळं ठीक
अन्यथा मीच तुरुंगवासाच्या शक्यतेने भयाच्या चीकाला चिकटलेली
हातावरच्या त्वचेचं झालय पीठ
पण माझं पिठलं काही तयार होत नाहीये
मला लागलीये खरेपणाची भूक
आणि आयुष्य मांडून बसलंय बोलघेवडं व्यासपीठ

नुस्ती अखण्ड बडबड चाललीये आत बाहेर
वायफळीचं जायफळ नुस्ता वास देतंय
शेवटची आशाही काल कड्कन मोडली
जेव्हा मी आईशीही खोटं बोलले

आता मुक्तीशिवायचं ह्या जगातून निघून जायचं
आणि आत्मदर्शनाचे भ्रमिष्ट सिग्नल प्रोजेक्ट करत राहायचं

मृत्यू येईपर्यंत क्षणाची ही रहदारी
आणि तिला मार्गदर्शन करणारा हा आपलाच हात खोटा
ट्रॅफिक पोलीसासारखा.
अबोटा.



## पुनर्जन्म

नुकताच रामाने माझ्यासमोर प्रजेचा निरोप घेतलाय

नुकतेच तुकोबा भक्तांना निरोप देऊन जंगलात गेलेत
नुकताच माझा पार्टनर आमच्या भागीदारीचा निरोप घेऊन
दुसऱ्या भागीदारीला जॉईन झालाय

आता मीही भाषेचा निरोप घेईन
आणि कवितेत परतेन
प्रत्येकवेळी मी अशीच परतलीये पुन्हा संत होऊन
पुन्हा जिवंत होऊन

माझ्या डोळ्यांना कॅमेऱ्याची मर्यादा नाही
की ॲडीक्शनही नाही
म्हणूनच मृत्यूच्या सगळ्या सिडक्टीव हालचाली पाहण्याइतपत
माझे डोळे सशक्त आहेत

मी प्रत्येकवेळी निरोप घेते
मृत्यूत शिरते
पुन्हा परतते
माझा मृत्यूइतकाच पुनर्जन्मावरही विश्वास आहे
मी भाषेत मरून गेलीये
आणि कवितेत माझ्या पुनर्जन्माचा प्रकाश मला स्पष्टच दिसतोय



## कावळा

एक कावळा कधीचा कावकाव करतोय
खरंतर पाहुण्याच्या स्वागताचा माझा मूड नाही
एक आखूड कळ पसरलीये माझ्या नसात
एक रविवार वाया गेल्याचं
कमालीचं दु:ख झालंय
ते पदरात खोचून बसलीये मी माझ्या श्वासात

सगळ्या सण्डे सप्लीमेंटस संपल्यात वाचून

लारा क्रॉफ्टही संपलीये बघून
माझ्या डोळ्यांना माणूसही नकोसा झालाय
आणि हा कावळा कावकाव करतोय

कोण येणार आहे माझ्या घरी

येणारे तर सगळे कोल्हापुरात बसलेत
माझ्या नावाचा जप करत
मग हा कावळा का ? त्याचा नाका का ?

ज्ञानेश्वरांची तस्बीर हालतीये
ह्या घराच्या चायनीज वॉलही चालायला लागल्यात
हिचकॉकचे कावळे सीडीतून बाहेर पडतायत
त्यांचा मिळून एक भलामोठा कावळा झालाय
ही सोनी आहट कोणता कट करतीये
हा कावळा सलीम अलीचा कोणता इफेक्ट आहे
की मी कावळा शिवल्याने आजारी पडलीये ?

काळा रंग पसरत चाललाय सर्व वस्तूंवर
हे स्टूल ही खूर्ची
एक एक गोष्ट काळी होत चाललीये

आख्खी पृथ्वीच कावळा बनतीये की काय
की परमेश्वरच कावळा झालाय शेवटच्या न्यायनिवाड्यासाठी
आणि पसरत चाललाय वस्तूमात्रांवर अंगगात्रांवर

मीही काळी पडत चाललीये
आणि ही मी लिहीत असलेली कविताही
काहीच दिसेनासं झालंय मला
बहुधा काळोख पडत चाललाय बाहेर
किंवा कावळा पडत चाललाय सर्वत्र
किंवा माझ्या डोळ्यात काळोख भरून कावळा मला आंधळा करतोय

कुणीतरी माझा पत्ता विचारतय
त्याचा फक्त आवाज ऐकू येतोय
कोण येतय ?
काळ की वेळ ?



## समुद्राच्या काठावर

समुद्राचा पियानो वाजवतोय लाटा
मी किनाऱ्यावर कोरडी उभी
घालून पायात वहाणा बाटा



## घर

ज्या घरात फक्त टीव्ही चॅनेल्स बोलतात
माणसे शांत असतात
ज्या घरात जेवण इंटरवल असते करमणुकीची
आणि सण्डास नकोसे टाईमकीलींग
ज्या घरात फक्त फोनच असतो मोबाईल
आणि माणसे फिक्स असतात लॅण्डफोनसारखी स्वत:तच
ज्या घरात माणसे मॉडेलसारखी येतात
मॉडेलसारखी वावरतात
ज्या घरात मूल खेळते फक्त मॉनिटरच्या प्लेग्राऊंडवर
आणि आई जाहिरात बघून बेबीफूडचा मेनू ठरवते
त्या घरात कविता नसते
कवयत्री नसते
त्या घरातील वेकअप कॉल
घड्याळात झोपी गेलेले असतात.



## राखी

एक राखी पाठवतीये काळजातून
तिच्यात सूर्य आहे, चन्द्र आहे
आणि तुझी माझी जन्मकुंडलीपण आहे

तुझ्या हातातील ग्लोवज् काढून ठेव
तुझी निमुळती बोटं अधिकच लांब कर
आणि राखी उचल
मात्र नखं आधीच काप
म्हणजे ती दुखावली जाणार नाही

माझं रक्त वाहतय तिच्यातून
आणि आपलं कॉमन जनेटीक कोडही
तुझ्या माझ्या सहवासाचा एक एक दिवस
मी टाईप केलाय तिच्यात माझ्या डोळ्यांनी
माझं टाईपींग वाईप करू नकोस
निदान पोर्णिमेचा अस्त होईतोवर
एक टेलीपथीही टेप केलीये तुझीमाझी
माझी तबल्याची साथ तुला आवडायची
तुझा वाहता गळा आजही माझ्या आयुष्याचा लळा आहे
आपण एकत्र सोसलेल्या झळा
ह्या टेलीपथीत आहेत.

वडा, सामोसा, मसाला डोसा, मिसळ
माझ्या कित्येक हॉटेली चवींचा पहिला परीचय तुझ्यापासून सुरु होतो
तुझे अध्यात्मिक डोळे माझी आजही समजूत घालतात
आणि जिज्ञासेचे वेफर करकर आवाज करत मी सहज संपवते
तुझा हॉटेलमधला शांत रसिक चेहरा आठवत
मी टॉवेलला हात पुसतीये
तर आपण एकत्र केलेली रोज रात्रीची जेवणे
माझ्या कीचनमध्ये आवाज करतायत

''सापांना दोर समज
म्हणजे चालणे सोपे होईल''
माझ्या पावलातली सगळी भटकंती
तुझ्या मॅनेजमेंट स्कीलचा परिणाम आहे
आणि माझी चालण्याची झील आजही कायम आहे
डॅडींच्या शतपावल्या मला आठवतायत
आईकडचे त्यांचे अक्षम्य दुर्लक्ष्य मला सहन नाही व्हायचे
तर तू माझी समजूत घालायचास
आणि माझ्या बरोबर चालायचासही
तुझ्या शतपावल्या अधिक कठीण होत्या हे आता कळतंय

तुझ्या मित्राच्या प्रेमात मी प्रथम पडले तेव्हा तू मूक
माझ्या भुकेचा पियानो कर्कश वाजत राहिला
एक सिंफनी वाजता वाजता बेसूर होत गेली
पुन्हा शांतता
प्रत्येक ॲपिअरन्स गेस्ट ॲपिअरन्स किंवा घोस्ट ॲपिअरन्स
आणि शेवटी नेहमीप्रमाणं तूच बरोबर निघालास
आता पाठीची त्वचा आरश्यात न्याहाळतीये तर
त्यात संशयाने थरथरणारी तुझी नाकपुडी दिसतीये
तुझा श्वास आजही मी पाठीत भरून घेते
आणि कुंडलिनीत मरुन जाते
तू मला पुन्हा जिवंत करशील ह्याची हमी
आजही चुकलेली नाही
ह्या दोऱ्यात ती हमी मी ओवलीये

मला खात्री आहे
ही राखी तू अलगद मनगटावर बांधशील
आणि तुझे काही श्वास माझ्या नावाने हवेत सोडशील

तुझे ते मोजके श्वास
मला वर्षभर जिवंत ठेवण्यासाठी पुरेसे आहेत.



## वस्त्रहरण

स्वर्गाच्या पायऱ्या चढण्यासाठी
कपड्यांच्या पायऱ्या उतरत जाव्या लागतात म्हणून
ह्या टबमध्ये उतरताना
मी होतीये नागडी
आंघोळीचा घोळ
घोळदार चढवत
माझं सगळं मांस करतीये पाण्याच्या हवाली
माझ्या देहाची नदी
ह्या टबभर समुद्राला जाऊन मिळताना
किती घेतीये वाकवळणं
तिचं स्टिअरींग दिसत नाही पण
कोणताही अपघात न करता
ती शेवटी पाण्यालाच मिळेल ह्याची मला आहे खात्री
माझ्या देहाचा मळ
मी सोडते आहे ह्या टबातच
हा सौंदर्यसाबण न्याहाळतो आहे मला पुरुषी नजरेनं
त्याची वासना शमावी म्हणून
मी मुक्त फिरवतीये त्याचा हात अंगावरून
नाहीतरी संभोग म्हणजे आंघोळच असते
सौंदर्याच्या नावाने केलेली
माझा सगळा मळ खसाखसा निघतोय साबणाच्या पुरषी हाताकडून
आणि मी स्वच्छ होतीये फेसातल्या फेसात
फुगे उडतायत आणि फुटतायतही

आता एकदाचा शॉवर सुरू करेन
आणि लटकायला लागेन फळासारखी ह्या बाथरुमला

हळूहळू स्वच्छतेत पिकत जाईन तेव्हा
माझं झालेलं असेल झाड
आणि तू कृष्णासारखा येशील तेव्हा

मी झाडावर टांगला असेल माझा हा निळा टर्कीश टॉवेल
आणि
वस्त्रहरणाची चिरंतन प्रतिक्षा



## मुक्ता

मुक्ता म्हातारी झाली नाही
की तरुणही झाली नाही बहुधा
ती मुलगीच राहिली गाणं गुणगुणणारी

तिला एम. सी. आली होती का
तिच्या कवितेत तरी तसा उल्लेख नाही

एम. सी. येण्याआधीच मुक्ती
वक्ष पेलण्याआधीच मोक्ष

तिची त्वचा गोरीच असणार
त्यामुळे काळी असण्याचा कॉम्प्लेक्स तिच्यात निर्माणच झाला नसणार
बाईच्या मोक्षात काळा रंग
फेअर ॲन्ड लवलीच्या ॲडसारखा आडवा
तिचे भाऊही गोरेच बहुधा

ती वाळीत टाकली गेलेली ब्राह्मण
म्हणजे अनटचेबलच
बलात्काराच्या समस्येने त्यामुळे फारसे सतावले नसणार तिला
आणि लहानपणी लग्न होण्याची शिक्षा
आपोआप रद्द झालेली

आता इतके सगळे फेवर्स
व्यवस्थेने लादलेले

मग मुंगी आकाशी उडेल नाहीतर काय ?

कधीचा शोधतीये
पण तिने गिळलेला सूर्य काही मला सापडलेला नाहीये



## गाणे - २

मृत्यू त्याच्या गनला सायलेन्सर लावून मला शोधतोय
आणि जीवनगाणे गात मी
ह्या आकाशाच्या पियानोखाली उभी
सारे पुरुष कोरसमध्ये अंग चोरुन उभे
सर्व बायका वाद्यात रीयाज पणाला लावून लपून बसलेल्या
दु:खांच्या तारा परफेक्ट जुळतायत
एक सिंफनी परफेक्ट आकार घेतीये

सर्वत्र माझेच आयझोटोप्स
आणि मी गळ्यात फॉस्फरससारखी जळत
स्वत:लाच जाळत
मुक्त गातीये

माझा आवाज कोणी रेकॉर्ड करो ना करो
माझ्या आवाजाची सीडी निघो ना निघो

माझी मुक्ती मुक्त गाण्यात आहे
हे मला कळलंय

माझे गाणे केसाने गळा कापणारे नाही
इतकेही कारण
मला गाण्यासाठी पुरेसे आहे



## ती अमेरिकेत भेटली

ती अमेरिकेत भेटली तेव्हा मी बर्फात गोठलेली
काळजाचा ससा गोठून देहाच्या फ्रीजमध्ये
आणि ती माझ्याकडे चीज मागायला आलेली
अनअमेरिकन

तिच्या स्कर्टच्या उघड्या मांड्या बघून माझी आई थंडावली
आणि बाप सापासारखा पुरुष झाला

तिनं माझ्या बापाला नजरेत झुलवलं
इंडियन कल्चरवर काही प्रश्न विचारले
आणि बाईकवर बसून आली तशी गेली

तिची उघडी पाठ
न सुटलेल्या कापसाच्या गाठीसारखी
क्षणात दिसेनाशी झाली

मग एका ट्रीपमध्ये आम्ही ब्रेसिअर्स शेअर केल्या
नाईटीज शेअर केल्या
तिचा वास तिचाच होता
त्याला उपमा देताना मला एकही इंडियन फूल सुचलं नाही

ती लेस्बीयन नव्हती
तरीही एकदा तिने माझे स्तन दोन मिनिट चोखले
भारतीय चोळीबद्दलची तिची उत्सुकता त्यानंतरच शमली

तिच्या देहात सूर्य वितळवत जाताना
माझा सावळा रंग तिला अधिकच उजवा वाटायचा
आणि मी पोहायला उतरले की
समुद्राच्या पाण्यात खास इंडियन मुद्रा उमटते
असं तिला वाटायचं

ती ख्रिश्चन होती
पण माझ्या घरातल्या देव्हाऱ्यासमोर ती
कसलेल्या भक्तासारखी नम्र व्हायची

गणपती तिला आवडायचा
आणि रवीशंकरची सतारही
मात्र इंडियन्स प्रचंड दांभिक आहेत
असं तिचं स्पष्ट मत होतं

मी तिच्या ई-मेलला कसलाही प्रतिसाद द्यायचे नाही
भेटायचं तर डायरेक्ट भेट
असं मी तिला इंडियन ठसक्यात म्हणायची

भारतीयांनाच प्रथम शून्याचा शोध लागला
हे तिला मान्य होतं
असा शोध फक्त आळशी माणसांनाच लागू शकतो
असं ती म्हणायची
मी मात्र निर्वाणाला पोहोचल्यानंच हे शक्य आहे
असं दणकून सांगायची

तिचे निळे डोळे
तिच्या बापाच्या जेलयात्रेने काळवंडायचे
त्याची फाशी निश्चित होती
मात्र त्याच्या मृत्यूखालीही ती जीवनात नांदत होती

तिचा बाप मेला आणि ती नाहीशी झाली
आणि कुणालाच दिसली नाही

तिच्या दारातली बाईक मात्र हळूहळू माझ्या डोळ्यात वितळली
आणि मला वेगाचे कायमचे वेड लागले.



## कधी उडाले

कधी उडाले
कधी सेटल झाले

हवेला दिले कधी श्वास
कधी पायांना थोडी जमीन
वृक्ष झाले फळे वाटली
कधी मुळातून उखडली गेले

कधी फुलापर्यंत सुई पोहचवली
सुवास ओवले
केसात माळले
कधी स्कायलॅब क्लब केली
कधी चन्द्रावर चालत गेले

कधी फोटोना दिले रंग
कधी व्यक्तीलाच ब्लॅक अॅन्ड व्हाईट केले
कधी सत्यालाच पाहिले ढिले
कधी भासही टाईट झाले

स्वत:पुढे ठेवला कॅमेरा
स्वत:लाच एकांतात शूट केले
कधी चॅनेलची ठोकरली ऑफर
आख्खे प्रक्षेपण ऑफ केले

कधी तरंगले
कधी बुडाले
बुडता बुडता पाण्यामध्ये
कवितेला ह्या कोरडे ठेवले



## धन्यवाद

मी माझ्या मुलाचे संभाव्य चेहरे पहात बसलीये
कधी ते तुझ्यासारखं दिसतंय
कधी माझ्यासारखं

त्याचे ओठ थेट तुझ्या ओठाचं पाणी पिल्यासारखे
तर डोळे थेट माझे डोळे झेरॉक्स केल्यासारखे
पांढऱ्या कपड्यात गुंडाळलंय त्याचं शरीर

त्याची त्वचा कोवळी आहे
आणि ते लेटेस्ट फॅशनसारखं ताजं आहे

सीझेरीनची कसलीच खूण त्याच्या चेहऱ्यावर नाही
फक्त मलाच कळ आली
की माझं सीझरीन झाल्याचं माझ्या लक्ष्यात येतं
माझ्या आणि कदाचित त्याच्याही
त्याच्या प्रथम दर्शनी तू ओवाळलेले रुपये
आणि त्याच्या आजीने ठेवलेली रवळनाथाची सुपारी
त्याच्या सोबतच आहेत

मी त्याच्या रूपातच इतकी खूष आहे
की त्याच्या नावावर चर्चा नकोच
अस मी ठरवून टाकलंय
ते नावारूपाला येईल तेव्हा येईलच

त्याच्या अंगाला अंग लागलं की ते रंगात येतं
त्याच्यासाठी प्रत्येक क्षण सण आहे
प्रत्येक कण आनंदाची थरथर

त्याला भूक लागली की माझे स्तन भरून येतात

मी दुसऱ्यांदा वयात आलीये म्हण ना
पहिल्यांदा बाई
आणि आता आई

सगळ्या खोलीभर त्याचा फ्रेशनेस भरून आहे
आणि मी संपूर्ण पृथ्वीला
मला आई केल्याबद्दल धन्यवाद देते आहे



## सेन्डऑफ

तू माझ्या नवऱ्यातून थेट माझ्यात आलास
इलेक्ट्रॉनिक जॉगींग करत
तू येतोयस हे कळूही न देता
कंडोम घालायला विसरलेला एक अनावर अवयव
आणि
बुरखा न घातलेली माझी योनी
तू येतानाही हसलाच असशील दिलखुलास
जसा आता हसतोयस

माझ्या आत तू झाडासारखा वाढत गेलास
मग मला फुलं आली फळं आली फांद्या आल्या

तुझा जन्म झाला तेव्हा
दिवस सूर्याचं शेपूट पकडून नाचत होता
आकाश ब्ल्यू डे साजरं करत होतं
आणि पृथ्वीमाय हिरवा शालू नेसून
हिंदी सिनेमातल्या मराठी आईसारखी
नटून थटून बसली होती

आता तू वाढतोयस
तुझ्या त्वचेत तांबं वितळत चाललंय

आणि तुझी हाडं माडासारखी उंच
आणि सागासारखी घट्ट होतायत आतल्या आत

तुझ्या लुसलुशीतपणाचं दूध संपत चाललंय
आणि तू वातावरणाची कॉफी पिऊन
थोडासा बापासारखा दिसायला लागलायस

तू मांडलायस खेळण्याचा भलामोठ्ठा बाजार
आणि त्यात मम्मी नावाची एक डॉलही ठेवलायस

मला कळतंय
तुझं खेळण्याचं वय संपत चाललंय
तुला वेध लागलाय तू कधी मोठा होणार ह्याचा
आणि तू कधीतरी मोठा होणारच
म्हणून मी अवघडून बसलीये

माझ्या पाठीमागे तुझा बाप
आणि पुढं तू
तुम्हा दोघांमध्ये सँडवीच झालेलं माझं गर्भाशय
आता हळूहळू नाहीसं होत चाललंय
आणि मी त्याचा निरोप समारंभ
कुणालाच न सांगता
स्वत:तच आटोपता घेतीये



## बीज

बीजाच्या मुळात जाऊन बीज नष्ट करावं म्हणून
बीजात शिरलीये
तर जमिनीनं तिचा अहिंसेचा नॅचरल एसी केलाय ऑन
माती सांगतीये झाड तयार होण्याचे फायदे

हवा पाठ थोपटून माझी
माझा श्वास रोखून हा मर्डर थांबवू पाहतीये
तर पाणी जमिनीतून चालत चालत येत
माझ्या आत जिवंतपणा झिरपवत
मी काय करणार ते
माझ्या रक्तात वाकून पाहतंय

एक बीज
आणि त्याच्या सौ जनेटीक तऱ्हा
त्याच्या फलनाचाच मला कण्टाळा आलाय
म्हणून मी त्याच्या आत
बीजाचे डोळे माझा कीलर इन्स्टींक्ट पाहूनही
मुळीच डगमगत नाहीयेत
मी मुळावर उठलीये तरी
ते माझी सायको म्हणून हेटाळणीही करत नाहीये
ते फक्त हसतंय
मी बीजाच्या इनरस्पेसमध्ये मृत्यूची सुरी घेऊन
त्याला मारण्याची धडपड करतीये
तरी ते हसतंय
मला काहीच बोध होत नाहीये
आणि त्याचं हसणं वाढतच चाललंय
मी बीजाला संपवतीये
आणि माझ्या डोळ्यादेखत ते झाड बनत चाललंय

बीज संपलंय
आणि मला चक्क झाडाची आई झाल्याचा फील येत चाललाय
झाड उभं आहे
आणि मी झाडात माझं मरण अनुभवून पुन्हा जन्मलीये



## वक्ष

मला माझ्या वक्षाविषयी कधीच कॉन्फिडन्स नव्हता
निसर्गाच्या बारकाव्यासारखे ते बारीक
आणि मी त्यांच्या सूक्ष्म सौंदर्यापेक्षा
स्थूल मॅग्नेटीक पोलवर फीदा होणाऱ्या पुरुषांकडून कंडीशन्ड झालेली

वक्षवल्ली आम्हा सोयरी
गावी आणि शहरी

वक्ष लहानपणी लहान होते
तेव्हा माहीतच नव्हते ते वाढतात म्हणून
मग कधीतरी रक्त वाहून मी बाई झाले
आणि त्यांच्या वाढीवर बारीक नजर ठेवण्याची मला सवय झाली

त्यांना फुगवता येते सिलीकॉन भरून घेऊन
हे कळाल्यापासून
मला सिलीकॉन व्हॅलीत जाण्याची ओढ लागली

शेवटी वक्ष फुगवण्यासही पैसा लागतो
आणि तो मिळवण्याचा सोपा मार्ग संगणकातून जातो

अमेरिकेत मी रमले नाही
वाळू भरून घेऊन वक्ष फुगतात
पण त्यांची ममी होते
हे अमेरिकेत कळाले
आणि मी वक्षांची ॲन्थ्रॉपॉलाजी थांबवली

आता मी पूर्वीसारखी वक्षाबाबत ॲपोलॉजेटीक नाही
टिव्हीवरच्या वक्षदार बायकांकडे दक्षदार दुर्लक्ष्य करायला मी शिकलीये

माझ्या पुरुषांनी माझ्या बुद्धीवर फिदा व्हावे म्हणून

कुठल्याही मिटींगमध्ये मी क्लीवेज मांडत नाही

फक्त मला झालेला ब्रेस्ट कॅन्सर
मी समस्त पुरुषांपासून लपवून ठेवलाय

वक्षात लपवून **ठेवावी अशी**
तीच एक गोष्ट **माझ्याजवळ** आहे



## तू माझ्या पोटात आहेस

माझ्या पोटात तू आहेस
मी आहे
लिंगनिश्चितीच्या गर्भपाती काळात
हा सस्पेन्स राखून ठेवण्यातच मजा आहे
तू माझ्या ह्या आदिम गुहेत
हक्कानं वावरतोयस
किती लहान करून टाकलय तुला मी
आणि स्वत:ला मोठंही
प्रत्यक्ष परमेश्वरही
ह्या पोटात सामावून जाऊ शकतो

अंडी फुटतायत
खडक सफरचंदासारखे मऊसूत होतायत
माझा श्वास कसा
कापसासारखा मुलायम झालाय
तू आत आलायस
आता मी तुला परत करेन
किती आनंददायक ही देवाण घेवाण
एक बीज आत घ्यायचं
आणि आख्खं झाड परत करायचं

जशी खाण तशी माती नव्हे
तर जशी माती तशी खाण
तू माझ्या पोटात मातीला मिळालायस
आणि मी आपणा दोघांना
पुनर्जन्म देण्यासाठी सज्ज आहे

गर्भार बाईला सर्वच ऋतू वसंत असतात
मी काळ फुलात थांबवलाय
आणि तू माझा सुवास बनून आत बाहेर सर्वत्र हिंडतोयस



## मित्र

तू सावधान नव्हतास
मी सावधान नव्हते
फक्त संबंध होते
जे जन्मत:च कात्रीवरुन चालत होते

तुझ्या काळ्याशार डोहडोळ्यात मी काळी झाले
तुझ्या आफ्रिकी नाकात आफ्रिकी
तादात्म आणि परात्म
कनफ्युजनचा एक झूलाच बांधला होता मी घरात
आणि आयुष्याला काल्पनिक झोके देत राहिले
पुरेशी धडधाकट नसलेली ही कॉस्मॉपॉलिटन बिल्डींग
आणि त्यात आपल्या प्रेमाचा चौथा मजला
लिफ्ट नसलेला
तू झूल्यावरून उसळलास
खिडकीतून खाली कोसळलास
आणि दोन पायावर उभा राहून
चक्क सुपरमॅनसारखा चालायला लागलास

तू गेलास
आणि परतलाच नाहीस

आता ह्या झूल्याची कर्कश करकर
आणि घरात मागे उरलेल्या आपल्या मुलाची रड

तुझ्यानंतरही तुझे मित्र चौकशीसाठी घरी येतात
झूल्यावर बसतात
हेतूपूर्वक आठवणी काढतात

खिडकी बन्द करण्याचं धाडस मात्र कुणीच करत नाही

त्यांनाही वाटतं
तू खिडकीतून कोणत्याही क्षणी येशील
ते सावधान असतात
माझ्याप्रमाणेच



## संथ वाहते

मी सर्वत्र पसरलेली
आणि तू माझ्याच एरीयात राष्ट्रासारखा उभा
तुझ्या सीमांची काचोळी ओलांडून
दुभदुभत्यांनी भरून वाहताहेत माझे स्तन
आणि तू राष्ट्रपुरुषी डोळ्यांचे धरण बांधत
स्कॅन करतो आहेस माझी मुक्त बॉडी
मी पाण्याच्या खांद्यावर बसून न्याहाळतीये
तुझ्या पुरुषत्वाची बन्दीस्त बिसलरी बॉटल
आणि तू मला कायमचीच बॉटलमध्ये बन्दीस्त करण्याची स्वप्ने पहात
सत्ता उबवत बसलायस
तुला चढत चाललीये बाटलीतल्या पाण्याची कृत्रीम नशा

आणि मी तुझं सारं प्रदूषण पचवत
संथपणे वाहतीच आहे कृष्णेसारखी
तुझ्या आसपास
तुझ्या आत
सर्वत्र



## चिंता

माझ्या खाद्यांवर बसलंय शांततेचं कबूतर
दहशतवादाचं गललठ्ठ गिधाड हिंडतंय कधीचंच आकाशात

माझा मुलगा गेलाय तू निवडलेल्या शाळेत

माझा पदर भरून गेलाय चिंतेनं
भर उन्हात सूर्य जळतोय आयुष्यासारखा
म्हणून साऱ्याच त्वचांनी घेतलीये सार्वजनिक सुट्टी

माझा मुलगा शाळेतून परतलेला नाहीये

सर्वच बायका वाट पाहतायेत त्यांच्या त्यांच्या मुलाची
आख्खा नवरा मुठीत घेऊन
आणि माझ्या मुठीत तुझी साधी मिशीसुद्धा नाही

आताच समोरुन ट्रक गेला धडधडत
त्याच्यात बहुधा दहशतवादी भरलेत
किंवा आर. डी. एक्स
आमच्या अंगावर त्यानं उडवलेली धूळ ग्लोबल नाही
तिला इथल्याच मातीचा वास आहे
सर्वचजणी ती त्वचेवरून पुसतायत
आणि त्वचा सूर्यासाठी खाली करतायत

प्रत्येकजण उत्सुक आहे आणि दु:खीही
मुलगा येणार म्हणून उत्सुक
आलेला नाही म्हणून दु:खी
आमच्याबरोबर मुलांची वाट पाहणारा बसस्टॉप
सवयीनं झालाय स्मशानासारखाच मुर्दाड
त्यानं आयांच्या अशा कित्येक दुपारी
प्रतिक्षेत मरताना पाहिल्यात

मला एक टीव्ही दिसतोय समोरच्या घरात
शेजारी एक मीड डे
लाच भांडणे आणि नुकतेच झालेले बॉम्बस्फोट
माधुरी दीक्षित अशी वाकलीये
की जसे तिचे एमसीचे कपडे माझ्या वॉशिंग मशीन मध्ये
नियमीत धुवायला असतात

मुलगा येत नाहीये
पण तो ह्याच बसस्टॉपवर येणाराय
अशी इन्फर्मेशन आहे

मला काकांची आठवण येतीये
माझ्या लहानपणी त्यांनी दिलेली कॅडबरी माझ्या त्वचेत साकळली
आणि मी सावळी झाले
मला मुलगी झाली असती तर ती कशी झाली असती ?
काका दहशतवाद्यांना मारमामारता नाहीसे झाले काश्मीरमध्ये
त्यांच्या आठवणीनं थरथरतय खांद्यावरचं कबूतर
मी प्रतिक्षेतच मरणार म्हणून गिधाडानं
त्याचा हिंडण्याचा वेग वाढवलाय

माझ्या पर्समध्ये बॉम्ब नाही
तरीही समोरचा पोलीस संशयाने मला न्याहाळतोय
माझ्याजवळ तू नाहीस असं स्पष्ट
लिहलंय माझ्या कपाळावर बहुधा

किंवा माझा चेहरा जन्मजात घटस्फोटितेचा असावा
हा देश म्हणजे संपूर्ण मीच होऊन गेलीये
पुरुष पीटर इंग्लंड घालून ग्लोबल लंड होतायत
आणि मी माझ्या साडीत युनिवर्सल चिंता बनून उभी

माझा मुलगा शाळेतून जिवंत परतेल ना ?



## बोन्साय

तुला नग्न पाहिलं मी आकारात आणि रंगात
तुला भग्न पाहिलं मी कणात आणि तरगांत

मोनोटोनस पुरुषाचा सरळसोट मग्नपणा
ना पृथ्वीची गोलाई
ना गरोदरपणाची बांधेसूद डौलाई
किती काटेकोर आहे तुझं पुरुषी अंग

तू माणूस नसतास तर
बोन्साय म्हणून तुला कुंडीत ठेवून दिला असता



## तयारी

त्यांनी माझ्या चेहऱ्यावर ॲसीड उधळलं
आणि माझ्या चेहऱ्यावर थोपलेली समस्त पुरुषी त्वचा जळून
खाली गळून पडली

मी आता बुरख्याला खऱ्या अर्थाने नकार देऊ शकते

दहशतवादी मुतून गेलेत माझ्या घराच्या बाथरूममध्ये
त्यांच्या लघवीचा वास दहशतीइतकाच उग्र आणि तीव्र

मी आता प्रसवेन माझ्या सुगंधातून माझ्या घरात
एका नव्या स्त्रीचा चेहरा
आणि शतक शतक तुडवीत करेन
माझ्या नव्या जन्माचं दमदार सेलिब्रेशन

मी घाबरलेली नाहीये
मी नव्या सृजनाची तयारी करतीये



## मुलं

मुलं डिप्लोमेटीक असतात
आणि पॉलिटीकलही
त्यांना कॅडबरीतल्या आळ्या कळत नाहीत
पण कॅडबरी आळवणारा - आणणारा हात
आपल्या बापाचाच असतो
हे एग्झॅक्ट कळतं

त्यांना कळतं आई कधी पातळ
आणि कधी घट्ट असती ते
ती योग्य सम साधूनच भोकांड पसरतात
आणि तोण्ड वाासून आईला
योग्यवेळी ब्रह्मांडही दाखवतात

ती शेजाऱ्यावर प्रेम करतात
योग्य शेजारी असेल तर
आणि आईवडीलांनी सांगितलं म्हणून
शेजाऱ्याला आईवडील घरी नाहीत
अशी अस्सल लोणकढीही ठोकतात

मुलं निरागस असतात
म्हणून सहसा कुणाचा खून करत नाहीत

पण नको झालेले खेळणे
तोडून फोडून टाकण्याइतकी
ती क्रूरही होऊ शकतात

मुलं पशूच असतात
म्हणूनच त्यांना शाळेत घालावं लागतं
शाळेत ती माणूस व्हायला लागतात
आणि दांभिकही

मुलं राजकारणीच असतात
फक्त ती प्रथम खेळतात
मग राजकारण करतात
माणसं प्रथम राजकारण खेळतात
मग खेळात मूलपण साजरं करतात



## फोटो

माझा मुलगा आहे एक पुरुषच
तरीही माझं त्याच्यावर आख्खं प्रेम आहे
आणि सख्खंही

मी विभागूच शकत नाही पुरुषाला
मुलात आणि बापात
त्याच्यात आणि तुझ्यात

म्हणून त्याच्या फोटोमागे मी तुझाही फोटो दडवलाय
घटस्फोटानंतरही



## उभय

I am neither black nor white
I am the gay
So I am the grey
Granite and infinite

समोरून गेलाय एक तंदुरुस्त सॉफिस्टीकेटेड हिजडा
आणि माझा जबडा त्याच्या बडबडीने
कनफ्यूज झालाय
मी आता माझ्या मुलाला सगळे ब्रह्मांड कोणत्या लिंगात दाखवू
(कृष्णाने यशोदेला ब्रह्मांड दाखवले ह्यावर माझा विश्वास नाही)

मी आई आहे
आणि माझ्या भोवतालचं सगळं जग
उभयलिंगी बनून माझ्या जबड्यात घोंघावतय.



## किंमत

हल्ली दिवस फक्त फळा फुलांचे आलेत
श्रमीक मुळाना मुळी विचारतच नाही कुणी
मातीत गाडलेले त्यांचे मल्टीव्हीलर चेहरे
फळांचा पाठलाग करतात म्हणून फळे जन्मतात
हेच कळत नाही फळं फुलं विकत घेणाऱ्यांना
मुळांपर्यंत लाईम लाईट पोहचत नाही
हा मुळांचा गुन्हा आहे

किंवा कदाचित प्रकाश मुळांपर्यंत पोहचताना
किंवा पोहचवला जाताना
कॅमेऱ्याला तो टिपता येत नाही
हा त्यांचा गुन्हा आहे

एक दिवस वृक्ष कोसळेल
आणि त्यावेळी कदाचित मुळांची किंमत कळेल
बाजारात पोहचलेल्या फळांना फुलांना मात्र
त्यानंतरही काहीच कळणार नाही कदाचित
फक्त टेलीपथीने त्यांची साल किंवा पाकळी क्षणभर थरथरेल



## बटू

तू वृक्ष नाहीस ह्याची मला कल्पना आहे
मी माती नाही हीही वस्तुस्थितीच
तरीही माझ्यातून अंकूर फुटेल न फुटेल
म्हणून मी अस्वस्थ आहे
माझ्यात असलेली बीजाची संकल्पनाही
मला कदाचित फेकून द्यावी लागेल

मी हे सर्व तुला भयाने ऐकवतीये
आणि तू बटूच्या क्लोनसारखा
माझ्या गर्भाशयावर तिसरे पाऊल ठेवण्यासाठी
माझ्यासमोर मख्ख उभा आहेस



## स्तन

मी तुमच्या ग्लोबलायझेशनला दूध पाजू का ?
किती थकलंय बिचारं फॅरेक्स पिऊन पिऊन
त्याला बहुधा आईची गरज आहे
त्याला माझ्या हातात द्या

माझे बाहू छोटूकले असले तरी
त्याला दूध पाजण्याइतके माझे स्तन

निश्चितच मोठे आहेत



## ॲडमिशन

पुन्हा एकदा उदासी पसरत चाललीये अंगभर संधीवातासारखी
पुन्हा एकदा ॲडमिशनला नकार मिळालाय
आणि मी पुन्हा एकदा स्वत:लाच जोजावतीये
फील गुड फील गुड
बी पॉझीटीव्ह बी पॉझीटीव्ह

शिवा खेर नुक्ताच शिटी मारून गेलाय माझ्या मेंदूत
नेपोलियन हील भरवत बसलाय काळजाला
पॉझीटीव थिंकींगचे फायदे
प्रत्येक चॅनेल माझ्या डोळ्यांची करमणूक करतंय
एखाद्या औषध योजनेसारखं
आणि सुस्तावलेला संगणक प्रोग्रामत बसलाय नेहमीचेच
सोकॉल्ड रेसियल फास्ट गेमस्

कुठंच मन लागत नाही
अंगावर जणु एक पुरळ उठलाय
आणि त्याची जागा सापडत नाहीये

मुलाच्या पालनपोषणातली एक्साईटमेंट संपून गेलीये
उलट त्याच्या स्कूलच्या ॲडमिशन अँक्झायटीने
मीच परीक्षेला बसलीये असं वाटतंय

काहीवेळा वाटतं
ह्या अशा सिंगल पॅरेन्टहूडपेक्षा
तुझा शॅव्होनिझम बरा होता
निदान त्यात हमखास प्रवेशाचा रिलीफ होता

तू एक फोन केला असतास भाईला
आणि एक क्वालिटी स्कूल मॅनेज झालं असतं

आपला मुलगा इंटरव्ह्यू देऊन देऊन झोपेला आलाय
आणि मी त्याला कधी झोप लागतीये त्याची वाट पहात
जोजवत बसलीये
उद्या कदाचित त्याला ॲडमिशन मिळेल
तोही आयुष्याच्या एक्झाम सेंटरवर
परीक्षेला बसायला लागेल
आणि गुणादोनगुणाच्या स्पर्धेय टक्केवारीत
स्वतःच्या आयुष्याचं क्वालिटी आईसक्रीम जज करत बसेल

मी नजरचुकीनं बाहेर ठेवलेलं दूध नासून गेलय
आणि फ्रीज
माणसाला फ्रेश ठेवण्याइतका विकसीत झालेला नाही म्हणून मी
दूधासकट आताच्या 'मी' ला
बेसीनमध्ये ओतून आलीये

उद्या पुन्हा नवी दुधाची पिशवी
पुन्हा नवा फील गुड चहा
पुन्हा एक ॲडमिशन अटेम्प्ट
आणि कदाचित रात्रही पुन्हा अशीच
उदास आणि विचित्र

मी झाकीर हुसेनची जाहिरातीतली भाडोत्री ताजगी ऐकत
झोपी जाणाऱ्या मुलाला पाहतीये
आणि माझ्या दुःखी जागरणात
माझ्या मुलाची निरागसता
दुधासारखीच नासत चाललीये.



## मुलं - २

शिक्षक फळ्यावर लिहितायत
आणि मुलं त्या लेखनाची फळ होण्याची वाट पाहतायत

ड्रायव्हर रिक्षा वाहतायत
आणि मुलं रस्त्यांच्या फांद्या होण्याची वाट पाहतायत

डॉक्टर ऑपरेशन करतायत
आणि मुलं स्वत:चं आरोग्य
झाडासारखं आपोआप ऑपरेट होईल ह्याची वाट पाहतायत

खेळाडू खेळ्या उभारतायत
आणि मुलं युद्धभूमीच्या सूरपारंब्या होऊन
त्यांना शांततेचे झोके घेता येतील त्याची वाट पाहतायत

कामगार श्रम करतायत
आणि मुलं आपल्या आईबापांच्या घामाला
फुलं येतील ह्याची वाट पाहतायत

शेतकरी शेती करतायत
आणि मुलं संपूर्ण पृथ्वी स्वत:त पिकून
भुकेचं सेल्यूलोज तयार होईल ह्याची वाट पाहतायत

मुलांना सगळं जग झाडासारखं दिसतंय
आणि सगळ्या झाडांचे डोळे मुलांच्या डोळ्यांवर खिळून आहेत

मुलं वाट पाहतायत
जे झाडासारखं दिसतंय
ते झाडासारखं होण्याची
आणि त्यांच्या आया
ही प्रतिक्षा मुलांच्या डोळ्यात काय भरणार ह्या चिंतेने

झाडांइतक्याच अस्वस्थ होऊन
झाडांसारख्याच सर्वत्र उभ्या आहेत



## निळा

तिला निळा आवडायचा आणि मलाही
समुद्रातही आम्ही आकाश पहात बसायचो
जणू पाण्याशी आम्हाला कसलं कर्तव्य नव्हतंच
घरात पाणी भरताना
त्यात आकाश पडत नाही
म्हणून पाणी भरण्याचा आम्हा दोघींनाही कंटाळा

शेवटी मी उपाय म्हणून
निळा बॅरेल आणून ठेवला
पण तरीही त्याच्यातल्या पाण्यात समुद्राची मजा नव्हतीच

एकदा मी म्हणाले
आय हेट श्रीकृष्ण ॲन्ड राम आल्सो
तर ती म्हणाली,
"असकसं ? निळ्यावर प्रेम करणाऱ्या प्रत्येकानं
विष्णूवर - त्याच्या अवतारांवर प्रेम केलंच पाहिजे"

मला मात्र ते कधी जमलं नाही

तिच्या सगळ्या चित्रात
पुरुष निळा असायचा
आणि बाई मात्र निळा सोडून कुठल्याही रंगात
जणु बाईच्या अंगाला निळा रंग लागतच नाही
अशी तिची खात्री होती

हळूहळू तिचे निळ्याचे वेड वाढतच गेले

आणि आख्खा कॅनव्हासच निळा व्हायला लागला

प्रत्येक रंगाला निळं बॅकग्राऊन्ड वाजायला लागलं

मी म्हणायचे कधीतरी काळा वापर
शेवटी आकाशही निदान पावसाळ्यात तरी थोडे काळे होतेच
पण तिच्या कॅनव्हासवर भरलेले ढग जमायचेच नाहीत
कायम रिक्त निळे आकाश

एकदा मी स्वच्छ शुभ्र बुद्ध आणला होता
तर तोही तिच्या कृपेने रातोरात निळा झाला

शेवटी एक दिवस संतापाने तिच्या कॅनव्हासवर
मी लालच लाल फेकून दिला
आणि तिला न सांगता ऑफिसमध्ये निघून गेले

रात्री घरी परतले तर सगळे शांत
फक्त एक चिठ्ठी
कॅनव्हास लाल झाल्याने मी घर सोडून जात आहे
ज्या घरात माझा कॅनव्हास लाल होतो
त्या घरात मला रहायचे नाही

मी तिची पुष्कळ वाट पाहिली
पण ती परतली नाही
आणि एक दिवस तिच्या आत्महत्येची बातमी आली
तिनं समुद्रात जीव दिला होता.



## अनूटचेबिलिटी

तू मला हवा आहेस

माझी जीभ मला तुझ्यात घोळवायची आहे
चाटायचा आहे तुझ्या स्पर्शाचा सर्प
भिनवून घ्यायचे आहे तुझ्या भाषेचे विष
घोळवायचे आहेत ओठ तुझ्या ओठात
माझी लिपस्टीक तुला चढवायची आहे
चढवायची आहे चुंबनाची स्लॅपस्टीक कॉमेडी

अथंपासून इतिपर्यंत घ्यायचा आहे तुझा भोग
म्हणून तुझ्या दारापाशी आलीये
तर तूच थांबलायस

HIV पॉझिटीव

भाषा मरून गेलीये
सुन्नतेची शांतता पसरत चाललीये ह्या क्षणात

कंडोम चढवून पॉसिबल आहे

मी शक्यता पाहतीये
आणि तिच्याकडे पाठ करून स्वत:त चालतीये

रिस्क आणि ओढ

खूप विचार करतीये
आणि अनटचेबलिटीत परततीये

तुझी आवराआवर चालू आहे
तिचा आवाज मला ऐकू येतोय

मला कसलीच सारवासारव करायची नाहीये
मी तुझा निरोप घेताना तुझा हात हातात घेतीये
सोडतीये

मी काय करतीये मला माहीत नाही

तू चाललायस
आणि मी तुला थांबवत नाहीये

फक्त माझ्या हातातल्या हातात निर्माण झालेलं गावकूस
हलत राहताना
त्यांच्या हालचाली मुकाट पाहतीये

मी ब्राह्मण झालीये असा गील्ट
माझ्यात माझ्या आयुष्यात प्रथमच पसरत चाललाय



## काच

मी तिच्या घरी गेले तर
आख्खं घर नागडं
काचांचा घरगुती पारदर्शक विकास
आर्किटेक्चरची ग्लासीकल डॉयनॉसरी रास

तिनं दरवाजा उघडला तेव्हाही
ती बॉटलसारखी उभी
तिच्या देहात पेप्सीच वहात असणार
असं मला उगीच वाटून गेलं

तिच्या काचेच्या टीपॉयवर मी माझं डीलींग मांडलं
तिनं काचेच्या ॲश ट्रेत ग्लोबल मार्केटची सिगारेट टेकवत
ग्लोबल ॲश झटकली

तिचे सगळे व्यवहार क्रेडीट कार्डाचेच
आश्चर्य म्हणजे ते मात्र काचेचे नव्हते
पण त्यांना वेष्टन काचेचे

ती बोलायला लागली तेव्हाही
सोडावॉटरच्या बॉटल्स फुटायला लागल्या
तिचे शब्द गोट्यांसारखे माझ्यावर आपटत होते

तिच्या शंका मला कापत होत्या
त्यांना काचेची धार होती

मी रक्तबंबाळ झाले पण तिच्याकडे हळद नव्हती

मी व्हिस्की नाकारली
तसे तिचे काचेचे डोळे विस्फारले
तिने कॉफीची ऑर्डर दिली

अपेक्षेप्रमाणे मग काचेचेच मग आले

तिची बोटॅनिकल गार्डनही काचेचीच होती
मात्र फुलझाडांना काचा येत नव्हत्या
फुलेच येत होती

मी तिच्या घरभर काचेवरूनच फिरले

डीलींग संपले तेव्हा तिचे दात आरश्यासारखे चकाकले
म्हणून मी तिच्या दातात मला पाहिले
तर माझेही डोळे काचेचेच झाले होते

मी लिफ्टमधून खाली येतानाही जाणवत राहिली
ती पाठलाग करणारी तिच्या डोळ्यातील काच
आणि निरोप घेताना झालेला
तडकण्याचा आवाज



## स्वप्न

हे सत्य की स्वप्न मला कळत नाहीये

आगीतून कबूतरं फिनिक्ससारखी बाहेर पडतायत
साऱ्या कागदांची झाडं होतायत
कविता परततायत कवींच्यात
पक्षी फडफडत बर्फात नाचतायत
वातावरणाला पडलेली भोकं कुणीतरी बुजवतय

नाहीश्या झालेल्या कित्येक जाती पुन्हा जन्मतायत आरण्यात
अगदी वाघोबा देखील रस्त्यावर दिसत नाहीयेत

सगळे विषारी गॅस नाहीसे होतायत हवेतल्या हवेत
ते सोडणारे कारखाने अदृश्य होतायत
पाणी परतलय पुन्हा एकदा नदीच्या शुभ्र अंगात

तृष्णा नाहीशी झालीये
आणि मी स्वत:त उभी राहून
पाहतीये स्वत:चं मूळ सौंदर्य

कोणीतरी पर्यावरणाची वैश्विक छत्री उभी केलीये
आणि सारी पृथ्वी
हिरव्या रंगाची होळी माझ्या नजरेत साजरी करतीये



## नाणं

चन्द्राच्या दुसऱ्या बाजूला असतो चन्द्र
अंधाराच्या दुसऱ्या बाजूला अंधार

सूर्याच्या दुसऱ्या बाजूला असतो सूर्य

पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूला असते पृथ्वीच

फक्त हे नाणेच आहे विलक्षण
त्याच्या एका बाजूला आहे हेड
तर दुसऱ्या बाजूला टेल

एक चिनी ड्रॅगनच वावरतोय बहुधा त्याच्यात
जो आपलीच शेपूट आपल्याच तोंडात पकडून
ह्या नाण्यात बन्दिस्त आहे

मी बघतीये
प्रत्येक माणूस ह्या नाण्यानं गिळून टाकलाय
आणि तरीही प्रत्येक माणूस
नाणी खुळखुळवत वाजत गाजत चाललाय

प्रत्येकाला वाटतय तो नाण्याला खेळवतोय
आणि प्रत्येक नाणे नाणेफेकीत
त्याला हेड की टेल एवढाच चॉईस देतय

जो जिंकतोय त्याला जिंकल्याचं समाधान आहे
जो हरतोय त्याला हरण्याचं दु:ख आहे
आणि नाणं माणसांच्या सामन्याचा फैसला करत
गालातल्या गालात फक्त हसतय



**मस्तक**

शेवट न बघताच केलेली सुरवात

फुलं थुंकली तरी त्यातून सुवासच दरवळतो
म्हणून मी फुलझाडात उभी

एक ट्रेन गेलीये धडधडत
तिचं काळीज धाडधाड उडताना दिसलं तरी
डोळा टस ना मस
ती माझ्या आत्महत्येच्या स्टेशनवर थांबलीच नाही

चन्द्राला दोरा बांधून कुणी पौर्णिमा उडवतय आकाशात
आणि चन्द्र कुणीतरी सूर्य उडवून
आपला कटी पतंग करेल म्हणून घाबरलाय

एक भिकारी फक्त हिऱ्याची भिक मागतोय
आणि सुटाबुटातले सगळेच
पुण्य कमवता येणार नाही म्हणून ओशाळवाणे झालेत

एक माणूस मिसळ खातोय
त्याच्या बशीत झाड आहे कागद आहे आणि कविताही
त्याला साल्वोदार दालीनं डायटींग करण्याचा सल्ला दिलाय
पण त्याने तो मनावर घेतलेला नाही
ऑईलपेन्टमधलं ऑईल खाऊन खाऊन
त्याचं वजन वाढतच चाललय
आणि वर पुन्हा ही मिसळीची चव

एक कबूतर आख्खा सॅटेलाईट घेऊन
घर बांधण्यासाठी जागा शोधतय
आणि एक बिल्डर स्पेशल बिल्टअप एरिया वाढवून सांगतोय

मी शॉटमागून शॉट जोडतीये
आणि माझ्यासमोर माझे शंभर तुकडे
माझं मस्तक जोडत बसलेत



# लेस्बियन

मी स्वत:लाच लक्ष्यात ठेवण्यासाठी कविता लिहितीये

एक इरेझरच बसलाय माझ्यात
परमेश्वरासारखा
काही नोंद होण्याआधीच तो ते ऑफ तरी करतो
किंवा नोंदलं तर इरेझ तरी करतो

माझ्या स्मृतीवर तो नजर ठेवून आहे
मला त्याचा सूक्ष्म कॅमेरा जाणवतो
पण तो नेमका कुठं लपलाय
ह्याचा अंदाज येत नाही

कुणी माझं नाव उच्चारलं तरी
ते रेकॉर्ड होणार नाही
ह्यासाठी त्याची धडपड चाललीये
सूर्य मला नीट वस्तू दाखवेल म्हणून
तो सूर्याला माझ्यापर्यंत पोहचू देत नाही

त्याच्या कैदखान्यात
मला ॲम्नेशियाची सजा भोगण्यासाठी पाठवण्यात आलय
आणि तो त्याच्या परीने
प्रामाणिक प्रयत्न करतोय

माझे जनेटीक कोड माझी स्मृति
पुढील पिढ्यात घेऊन जाईल म्हणून
माझ्या भवतालचे सगळे पुरुष
त्याने गायब केलेत
आणि मी
स्वत:लाच लक्ष्यात ठेवण्यासाठी
ही कविता नावाची बाई जवळ केलीये

मी लेस्बीयन नाही ह्याची त्याला पक्की खात्री आहे
आणि मी तशी बनत चाललीये असा मला संशय आहे



## दगड

आता फक्त दगडच उरला
फूल उमलले होते पण ते कोमेजून गेले

देहाच्या सळसळणाऱ्या कुरणात
गायी चरल्या बैल चरले
मला तर चेहराही पहायचा नव्हता
आणि ओठात कीसचे फुलके फिरले

वारा वहातच होता हवा डोंगर हलवत होती
एम सी उलटलेली मी रक्त झुलवत होती

देहात सदेह विमान उतरले
कुणी भुकाराम आत उतरला
मला तर थेंबसुद्धा नकोसा होता
आणि आख्खा ढग माझ्यात पसरला

रावणाचे विमान पाहून मीच त्याच्याबरोबर पळून गेले
पायलेटचा मला सनातन मोह जे लक्ष्मण होते ते जळून गेले

वरून कुणी टॉप अँगल लावला
मी कॅमेऱ्यात अभिनय केला
मला तर कुणाबरोबरच जायचे नव्हते
मी त्याच्याबरोबर तो माझ्याबरोबर गेला

माझ्यात काहीतरी उमलत गेले एक पुरुष सुवासत गेला
मला तर करायचे होते काळीज दगड

एक निखारा फुलासारखा फुलत गेला

एक आग
एक जाग
एक आकाशात गेलेली शिडी
एक ढगाने फेकलेली सीडी

पाऊस वाजला
माझ्यात एक दगड नाचला



## साधना

नैतिकतेसाठी माझ्या बाहेर पहात नाही मी
बाहेर सर्वत्र पशुच आहेत
मला हवा असलेला मनुष्य
मला माझ्या आतच सापडेल
कदाचित तोच ईश्वर असेल

चतुष्पादी द्विपादी तर सर्वत्रच हिंडतायत
मला बिनपायानेच सर्वत्र हिंडायचं आहे
ईश्वराला पाय नसतात
म्हणून तो सर्वत्र असतो

मी आरश्यात पहात नाही आजकाल
आरश्यात तेच दिसतं जे तुम्ही बनलेले आहात
जे तुम्हाला असायचं असतं
त्यासाठी आरसा काहीच करू शकत नाही

अन्न उगवते जमिनीत
श्वास उगवतो हवेत

मी बिनपायाचा माणूस उगवण्याची वाट पाहतीये माझ्यात
आणि तो उगवत नाहीये
बहुधा त्यासाठी मला माणूसच पेरावा लागेल

बिनपायाच्या माणसाचं बियाणं मिळत नाही बाजारात
ते स्वत:च तयार करावं लागतं
म्हणूनच मी झाडासारखी
ऊन पाऊस खाऊन जगेन म्हणते

मी बिनपायाचा माणूस तयार करायला चाललीये
आणि माझ्यासोबत आहे एक सूर्य
आणि त्याने धाडलेले समुद्राचे पाणी
पृथ्वीला दोन पायांचा माणूस तयार करायला तेवढेच पुरले
कदाचित मलाही बिनपायाचा माणूस तयार करायला तेवढेच पुरेल

माणूस तयार करताना
पृथ्वी किती एकाकी होती
हे आता मला स्पष्ट कळतय



## समुद्र

त्याचा समुद्र माझ्यात पोहतोय
माझ्या रक्तात वाढत चाललय त्याच्या भेटीचं मीठ

माझ्या प्रेमाचं वजन वाढत चाललय
आणि मुश्किल झालय चालणं

रात्रभर माझ्या आत मासे नाचत असतात
त्याच्या डोळ्याचे डॉल्फिन श्वासात मारतात उडी

पहाट होते तेव्हा पसरलेला असतो त्वचेवर सूर्य

आणि त्याचे वाढलेले केस मला वारा घालत असतात

तो लग्नाविषयी काहीच बोलत नाही
मलाही कसलच आश्वासन नको असतं

माझ्या बांगड्या खणकतात
त्यांना मधूनच कधीतरी बांगड्याचा वास येतो
क्वचित ऑफिसमध्ये तळलं जातं गॉसिपचं पापलेट
आणि तेही कुणीतरी
त्याच्या समुद्रातूनच पकडून आणलेलं असतं
आख्खं शहर बिसलरी काखेत मारून फिरत असताना
मी ही अशी समुद्र घेऊन फिरणारी बाई

माझ्या डोक्यावरती आजकाल ढग उगवायला लागलेले
आणि पायांवर रोज त्यांचाच पाऊस
मी ही अशी रोज भिजलेली
आणि त्याला मात्र सर्दीचीच चिंता

त्याच्या नाकावर जेव्हा मी घासते नाक
तेव्हा अंगाला त्याच्या समुद्राचा वास येऊ नये म्हणून
मी बेडवर जाण्यापूर्वी बाथरूमला जाते

त्याला वाटतं मी शॉवर सुरु केलाय
मी फक्त ॲक्वागार्डमधून समुद्राला शुद्ध करून घेत असते



## इतिहास

एक सुटेबल इतिहास लिहिला जातोय माझा सर्वत्र
इतिहासकार मांडून बसलेत टेबल
आणि राजकारणानं घेतलय भाड्यानं

सत्य शोधणारं ऑफिस

मी आईविषयी विचारलं की
सांगितली जातीये मला माझ्या बापाची वंशावळ
आणि मुलीविषयी प्रश्न केला की
ऐकवली जातीये माझ्या पुतण्याची जिनिऑलॉजी

मी ज्या गुहेत जन्मले त्या गुहेत अंधार होता
ह्यावर साऱ्यांचंच एकमत
मात्र सूर्य ब्रिटीश होता की मुस्लीम की हिंदू
ह्यावर मतभेद

ब्रिटीशांच्या मते सूर्य ब्रिटीशच
कारण तेच एक साम्राज्य
ज्यावरचा सूर्य मावळत नव्हता
हिंदू तर गायत्री स्त्रीच होती
ह्यावर आडून बसलेले
आणि मुस्लीम तर त्यांच्या बुरख्यातून
नेमकं काय म्हणतायत
तेच ऐकू येण्याचा वांदा
पण सूर्य त्यांचाच होता हा त्यांचाही कान ठणकवणारा आग्रह

काहींच्या मते तर
सूर्य विभागताच येत नाही मुळात
मात्र माणूस विभागता येतो स्त्री आणि पुरुषात
असं त्यांचंही मत

मी जन्मताना दोन पायाची होते
मग चार पायाची झाले
असाही एक पाया घातला गेलेला आवाज
तर मी प्रथम चार पायाची होते
मग दोन पायावर चालायला लागले

असाही एक चालता बोलता प्रवाद

काल भूतकाळाच्या दफ्तरखान्यात गेले
तर तिथे माझ्या नावाची बखरच नाही
माझे श्वास भूतकाळात चालत
असा कोणताही पुरावा हवेत आढळला नाही म्हणे हवामानखात्याला

पुरातत्वखात्याने माझे उत्खनन केले तेव्हा
सापडले माझे गर्भाशय आणि स्तन
स्तनातून वावरलेल्या दुधात
संस्कृतिचे जीन्स सापडले
पण त्यातून म्हणे पुरुषांचीच प्रथिनं वहात होती

बाई म्हणजे मुळात चालता बोलता केऑस
आणि गॉसिप्स चघळणारी डिसऑर्डर
असंही एक मत नोदवलं गेलेलं सापडलं मला
माझ्याविषयी एका रियासतीत

माझ्या मृत्यूचा पुरावा मात्र
कुठेच सापडला नाही म्हणे
म्हणूनच मी जिवंत आहे का
ह्याची चौकशी करणारे फोन
येतात मला सत्याच्या ऑफिसमधून

मी फोन उचलते
ऐकते
आणि रॉंग नंबर म्हणून ठेवून देते

बहुधा त्या दोन शब्दातच मी जिवंत आहे



## लोटस

स्वत:च्या प्रेमात मी कधी पडलेच नाही
आरश्यात पाहिलं की आंधळल्यासारखं व्हायचं
डोळे चमकले की वाटायचं
बल्बच बसवलेत खोबणीत
आणि ते विझल्यासारखे वाटले की विरस व्हायचा
माझ्या हातांचा तर महाकॉम्प्लेक्स
बोटं कशी निमुळती हवी
पण मला वाटायचं किती मजबूत आणि जाड आपली बोटं
पाय मात्र सुंदर
पण त्यांची कधी कुणी स्तुती केली नाही
सगळ्यांचं लक्ष्य एक तर छातीवर
किंवा नितंबांवर
नितंबांनी तंबी दिली की बाईची दादागिरी प्रस्थापित
नाहीतर किमान वक्ष तरी
लक्ष्यवेधी हवेतच
पुरुषांचा भेद करायला

एक एक इन्फेरियर कॉम्प्लेक्सचे मजले तळघरात नेणारे
बाईसाठी तयार केलेले खास सुपर गिल्ट अप एरीयाज

शेवटी आत्यंतिक आत्मद्वेषाचा चिखल
बिल्टअप झाला शरीरात
आणि शरीर झाले
इनफेरीयर कॉम्प्लेक्सची मृण्मयी इमारत

आता ही इमारत घेऊन
ह्या शहरात फिरताना
लोक मला म्हणतात
यू आर सेक्सी
तेव्हा मी सात मजली हसते

आणि माझ्यात उगवलेलं आत्मसौंदर्याचं कमळ
कुणालाच न दाखवता
शांतपणे गाडीत बसून पुढच्या कामाला निघून जाते

यू लूक लाईक लोटस
असं म्हणणारा पुरुष मला अद्याप भेटलेला नाही



## पुरूष

पुरुष घरात आला की
माझी प्रकृती बिघडते

त्याच्या सांख्य डोळ्यात तरंगत असते माया
आणि तो लडीवाळ होताच
त्याला फशी पडण्याची शक्यता असते माझी काया
त्याला वाटतं तो आहे माझ्या घराचं मूळ
माझ्या अस्तित्वाचं कूळ
आणि अहंकाराच्या तोण्डात मला भरून घेऊन
तो भरू इच्छितो माझ्या शरीराची चूळ
माझ्या घरातल्या आरश्यात
त्याला दिसतो त्याचा सर्वसाक्षी चेहरा
आणि माझ्या अवयवांचे अलंकार मोजत
तो मोजतो माझा पसारा

त्याला शुद्धीवर आणण्याच्या मोहाने
फुलतो माझा पिसारा
ओठ होतात चंबू
आणि माझे सारे रंग पाहतात त्याच्या अंगाला झोंबू
त्याच्याशी मी केलेला संभोग
माझाच गेलेला तोल असतो

खरंतर माझ्याच प्रकृतीत जन्मलेला असतो पुरुष
माझ्याच गर्भाशयात तो रहात असतो ताजा
पण तरीही सगळ्या आदिकथा
त्याच्या नावाने रजिस्टर

त्याच्या बरगडीपेक्षा सृजनशील असतात
माझे स्तन हरघडी
आणि तो मात्र घरात आला की वाजवत बसतो
व्हायोलीन असल्यासारखी त्याची बरगडी

त्याची पावले चालत येतात घराकडे
तेव्हा त्याचे श्वास
रुंदावतात त्याची छाती
आणि सिड्यूस व्हायला चटावलेले माझे शरीर
ताटकळत बसते स्वत:तच पहात वाट
तो कधी घालतो मला मिठी

मला पडणारा त्याचा मोह
आणि त्याला जडलेली माझी आसक्ती

एका क्षणात काळोखाचं ॲपल फुटतं घरभर
आणि त्याच्या इगोच्या मिठीत जाते संपूर्ण घर

पुरुष घरी आला की
माझ्या आख्ख्या घराची प्रकृतीच बिघडून जाते



## ईश्वराला माहीत नाही

ईश्वराला माहीत नाही की तो ईश्वर आहे
आणि

मला हे स्पष्ट अनुभवायचं आहे की मी ईश्वर आहे

ईश्वर आहे एक कम्प्युटर
ज्याला माहीत नाही कम्प्युटर कसा ऑपरेट होतो ते
तो शून्यासारखा आहे
आणि तरीही त्याच्या असण्यात
सगळ्या कीज आहेत

मलाही आता फक्त असायचं आहे
म्हणून कधीपासून मांडते आहे मी
असण्यासाठी असण्याचे आसन
आणि प्रत्येक आसन असण्याची की असूनही
माझ्यासाठी करत नाहीये कसलंच फंक्शन

मला खरंतर माझं असणं डीलीट करायचं आहे
आणि कम्प्युटर कसलाही प्रतिसाद न देता
ठोंब्यासारखा बसून आहे

मी कधीपासून प्रयत्न करतीये
तो उठून चालावा
पण त्याचे पाय जागेवरून हलतच नाहीयेत

मी चालतीये
आणि माझ्या आता लक्ष्यात येतय
मी ज्याच्यात चालतीये तोही कम्प्युटरच आहे

मी अस्वस्थ झालीये
बहुधा मीही आहे ह्या कम्प्युटरमधलाच एक प्रोग्राम
आणि डिप्रोग्रॅमिंगचं कसलंही मार्गदर्शन न करता
कम्प्युटर जसा आहे
तसाच आहे



## ट्रॅक्स

आत्ताच ह्या ट्रॅकमध्ये काहीतरी सळसळल्याचा आवाज झाला

साप असेल
पुरुष असेल
स्त्री असेल
किंवा भासच असेल

आत्ताच ह्या ट्रॅकमध्ये काहीतरी मोडलय - कडाक
आत्ताच त्या ट्रॅकमध्ये अश्रू टपकलाय - टपक
एक संभोग पूर्ण झालाय
आणि त्या त्या ट्रॅकमधून कुणीतरी तृप्त झाल्याचा आवाज येतोय
उस्स्

ह्या आयुष्याच्या मल्टिप्लेक्समध्ये मी मौनात बसलीये
आणि आख्खी दुनिया मल्टि ट्रॅक साऊंड सिस्टीम होऊन
माझ्यावर आदळतीये

काळ होऊन बसलाय केवळ एक स्पीकर
घड्याळाची टीकटीक ऐकवणारा
आणि मी डीजीटल साऊंडच्या मल्टिट्रॅकी जंगलात
शांततेचा शो पाहण्यासाठी स्वत:च्या शरीरात बसलीये

मला खात्री आहे
कधीतरी समोरचा पडदा पूर्ण स्तब्ध होईल
आणि सारे साऊंड ट्रॅक्स
शांतता पोटात घेऊन
माझ्या मौनाच्या पायापाशी
निवांत बाळंत होतील



## ही कण्टाळ्याची नाव

ही कण्टाळ्याची नाव
रक्तही तसे मेलेले
जे जगायाचे होते
ते आयुष्य हातातून गेलेले

करायची नाही इच्छा
काहीच कुठे कधीही
होता कॅश करायचा चेक
पण खाली नव्हती सही

अवयवांची बोडकी झाडे
ना फूल ना त्यांना फळे
आरण्याचा सेट मांडलेला
रोज लाकूड त्याचे जळे

नाव चालली देहात
नशीब ! मृत्यूचे तिला भोक
कण्टाळ्यासोबत बुडेन
ते बुडणे असेल बिनडोक



## बाई

स्तनं जळतायत
मुण्डकं नाहीसं झालय
पाय शाबूत आहेत

हे चित्र बहुधा बाईचं आहे

कापूर काळा पडलाय
काली दिसत नाही पण तिच्या हातातली मुंडकी दिसतायत

वाघ चालत येतोय

हेही चित्र बहुधा बाईचे आहे

डोळे जळजळतायत
मुंडकं धडावर पक्कं आहे
पाय प्रदर्शन पहात हिंडतायत

हे तर निश्चितच बाईचं चित्र आहे

मी सोफ्यावर बसून
आरामात चित्रे सर्फतीये
आणि माझा हात हाताच्या अंतरावर
निपचीत तुटून पडून टेबलावर
रिमोटच्या कीज दाबतोय

ही बहुधा बाईच आहे



## रामायण

रावणाला दहा तोण्डं आहेत
हाच खरा लंकेला प्रॉब्लेम झालाय

त्याचं एक तोण्ड
सीतेवर बलात्कार करण्याच्या धमक्या देतय
तर दुसरं तोण्ड
तिच्या पातिव्रत्याची तारीफ करतय
एक तोण्ड तर
आपण सीता पळवून आणलीये हेच नाकारतय
तर एक तोण्ड
सीता चक्क माझ्याबरोबर स्वतःच आली

अशी लोणकढी थाप मारतय

रावण एका तोंडानं
लंकेच्या सर्व लोकांशी लोकशाहीवर चर्चा करतोय
तर दुसऱ्या तोंडानं टेररीझमची धमकीही देतोय
त्याच्या एका तोंडानं तर चक्क अमेरिकेची मदत मागितलीये
तर एक तोंड आपल्या नातेवाईकांचा राजकीय पसारा पाहून
कावून गेलंय

रावणाच्या अनेक राण्या आहेत
पण त्याचं कोणतं तोण्ड कोणत्या राणीचा मुका घेतय
हे खुद्द राण्यांनाही कळेनासं झालय

बिभीषण कनफ्यूज झालाय
त्यानं आय एस डी करून रामाला बोलावून घेतलय
रामाचं एक तोंड
रावणाची दहाही तोंडं कापेल
अशी त्याला आशा वाटतीये

रामाला अयोध्येतून हाकललं गेलय
म्हणून तो अयोध्येतून बाहेर पडलाय
स्वत:साठी तो ग्लोबल मार्केट शोधतोय
अशी त्याची ख्याती सर्व लोकलमध्ये पसरलीये

शीळा झालेली अहिल्या
त्याच्याच लेगल कनेक्शननं जिवंत झालीये
रामाचं पब्लिसिटी डिपार्टमेंट सध्या तीच सांभाळतीये

राम त्याचा ग्लोबल फेस घेऊन
सीतेला शोधत सर्वत्र हिंडतोय
सीतेचं आऊटसोर्सिंग करून तिला दहातोण्डी रावणानच
पळवलीये अशी त्याच्याकडे
जटायू चॅनेलने दिलेली कन्फर्म न्यूज आहे

राम समुद्र पार करत पुढे सरसावतोय
वानरांनी बांधलेले ग्लोबल सीब्रीज त्याला उपयोग पडतायत

युद्ध सुरू झालय
आणि जगातले समस्त प्रेक्षक 'रामायण' पाहण्यात मग्न आहेत

रस्ते ओस पडलेत
आणि रामायणाचा टीआरपी सर्वत्र वाढतच आहे



## आरसा

स्वत:च्याच आरश्यासमोर उभं राहिलं की
आपण स्वत:च फुटतो
तुकडे तुकडे होतात स्वत:चे

स्वत:च्याच आत्मज्ञानात जखमी झालेलं आपलं हृदय
आपण सर्वत्र विषादाचं रक्त घेऊन हिंडतो

आपण कधीच सुधारू शकत नाही
ह्याची विलक्षण चीड
आणि हातून होणाऱ्या त्याच त्याच चुका
त्याच त्याच भुकांतून

किती क्षुद्र असतं आपलं मनं
आपलं प्रेम तर ढोंगच असतं

द्वेष मत्सर गॉसिपींग
आतल्या आत असतात फक्त सवयींच्या गाठी
ज्या आपल्याला पोखरत असतात वाळवीसारख्या
सारी प्रवचनं जातात त्वचेवरून ओघळून
सारे संत फक्त शोकेससारखे

आपल्या फर्निचरात असतात बसून
स्वत:चा स्वीकार करता येत नाही
आणि संताना कचऱ्यात फेकण्याची माफीया ताकद
आपल्या काफीया कल्चरमध्ये नसते

एखाद्या कल्चर्ड मोत्यासारखे आपण
गोमटे आणि देखणे
आणि आपण खोटे आहोत
हे आपल्याला चांगलेच ठाऊक असते



## तीन बायका मॉडलिंग करतायत

तीन बायका मॉडेलींग करतायत
मी शूट करतीये त्याचं शरीर
आणि त्या त्यांचा आत्मा काढून घेऊन
स्वत:ला कपड्यात परफेक्ट मांडतायत

पहिली पांढरे केस चोपून चोपून बसवतीये
त्यांना पन्नास वर्षांची घरंदाज शिस्त आहे
दुसरीचे कुरळे केस धडपडतायत स्व.नेसाठी
पण त्यांना बुचड्याची चावीच सापडत नाहीये
तिसरीचा बॉबकट बण्डखोरीत उभा आहे
त्याचा पिसारा सर्वत्र उडतोय

तिघीही एका तेलासाठी मॉडेलींग करतायत
आणि मी तिघींनाही तेलासकट शूट करतीये
तिघींचेही केस एकाच तेलात चमकतायत
तिघींच्याही केसाचा गंध संपूर्ण सेटभर दरवळतोय
तिघीही केसात तेल ओतत सेटवर आग लावतायत

तिघींविषयी सेटवर कुजबूज चालू आहे

सगळे टॉपिक संपले की गॉसिप सुरू होते
सेटवरचा प्रत्येक पुरुष स्वत:च्या डोळ्यात जळतोय
प्रत्येकाला त्यांचे कपडे उतरवायचे आहेत
प्रत्येकाला त्यांच्या केसाला हात लावायचा आहे
पण तिघींच्याही केसाना तेल असल्याने
तिघीही अलगद पुरुषांच्या हातातून निसटतायत

तिघींना वाटतय
सेटवर पुरुषांचच साम्राज्य आहे
आणि त्या आहेत पुरुषांच्या कॉलनीज
त्यांच्या साम्राज्याचा सूर्य उबवत ठेवणाऱ्या
तर पुरुष हवालदील होऊन
त्यांचा प्रकाश पाहतायत
त्यांना वाटतय त्या तिघीच सेटच्या केन्द्रस्थानी आहेत
आणि पुरुषांना परीघावर ठेवण्यासाठीच
तिघी जाणीवपूर्वक सूर्य उबवतायत

मी कॅमेऱ्यात तिघींचाही सूर्य शूट करतीये
आणि मला त्यासाठी मदत करणारे सर्वच पुरुष
अंधारात उभे आहेत

सूर्य शूट झालाय
आणि मी पॅकअपचा पंधरा ऑगस्ट जाहीर करतीये
आता सर्वच आपापला स्वातंत्र्य दिन साजरा करण्याच्या मूडमध्ये
प्रत्येकजण एक साम्राज्य मावळताना पाहतोय
आणि तरीही कुणालाच
नेमकं कोण कुणापासून स्वतंत्र झालय
हे कळत नाहीये
नेहमीप्रमाणंच



## माणसे

सर्वत्र रक्ताचा प्रकाश पडलाय सक्त
लोक नागडेपणाकडेच झालेत आसक्त
अहिंसेची विरक्त वस्त्रे वाहून गेलीत रक्तात

लोकांची नखं चाललीत वाढत
आणि हातपाय होत चाललेत विद्रूप
जे सुंदर होते हात
ते लागलेत दिसायला माकडासारखे कुरूप
ज्या पायांनी केला उत्क्रांतीचा पूर्ण कोर्स
तेच झालेत दाखल पशुत्वात पुन्हा

चुंबन घेण्याचीही वाटायला लागलीये भिती
तोंडातून कधी सुळे बाहेर पडतील
ह्याची देता येत नाही शाश्वती

लोकांचा उडालाय परस्परांवरचा विश्वास पूर्ण
एकमेकाच्या संशयात उभे सर्व
शोक हर्ष आणि गर्व
प्रत्येकाचे मरण अटळ
फक्त प्रत्येकासाठी नेमली गेलेली नखं वेगळी

माणसांनी खाण्यासाठी
इतर जातीही ठेवलेल्या नाहीत शिल्लक
वनस्पतींत तर माणसांनीच सोडलेलं भिनलय वीष
जंगले झालीत कफल्लक
माणसांना एकमेकांना फाडून खाण्याशिवाय
पर्यायच नाही उरलेला
आणि माणसे
कम्प्युटर ऑपरेट करत
टीव्ही ऑन करत
सॅटेलाईट पृथ्वीभवती फिरवत

एकमेकांना मोबाईल करत
रक्ताच्या प्रकाशात
एकमेकांसाठी कॅन्डल भोजन आयोजीत करत
एकमेकांना खातायत



## माप

सगळं कसं मापात बसवलं

सँडल्स मापाचीच आणली पायाच्या
चालणंही मापात व्हावं म्हणून केली मांजरचालीची प्रॅक्टीस
पाय नाही पडू दिला वाकडा
ठेवला बुटेबल मापातच

शिवले सुटेबल कपडे मापाचेच
क्लीवेज दिसणार नाही टचेबल ह्याची यथास्थित घेतली काळजी
स्कर्टही शिवला मापाचाच
एकही मांडी पडू दिली नाही थोडीही उघडी

घरतर बजेटच्याच मापाचे मिळाले
कर्ज मापात हप्ता मापात व्याज मापात
कीचनचा कट्टाही बसवला मापात
आणि आंघोळ करतानाही पाणी वापरले मापातच

जेवताना तर फीक्सच होते कॅलरीचे माप
जगण्यापुरती मापात जेवले
मापात जे जे बसत होते त्यालाच शिवले
बॉडी मेन्टेन केली फिगरच्या मापात
आणि जो मेन्टेनन्स मार्केटला दिला
त्यालाही घरखर्चाचे यथास्थित माप लावले

सुहागरात्रही मापाचीच केली
गादीचे माप मोजतचं पसरले स्वत:तील मादीचे पाय
मापक रात्र मापक लांबी मापक खोली
निसर्गाच्या मापातच केला संभोग
ॲडजस्टेबल राहिले स्पर्शातही
आणि स्वत:ला सांडले मापातच
दूध तापले तरी उतू नाही जाऊ दिले
जे काही पिले ते मापात घालून पिले

टिव्ही, कम्प्युटर, गॅस
सर्वांना मापानुसार टेबलं दिली
धान्य, मसाले, कपाटं
सर्वांनाच मापानुसार जागा किंवा डबा

मुले प्रसवली मापातच
वाढवली मापात
त्यांच्याच मापशीटवरून मोजले स्वत:चे शिक्षण आणि संगोपन
त्यांच्याच माप शीटवरून जोखले स्वत:चे ढ पण

सायंटिस्टनी सांगितले पृथ्वीचे माप
सूर्याचे माप
ऑक्सिजनचे माप
मी प्रत्येक मापाला फक्त डोलवली मान
मोजायला बाहेर पडले नाही प्रत्यक्ष माप

हवा तर श्वास मापत मापतच आली आत
आणि जे हवेत सोडले तेही मापत मापत गेले हवेत

एक ईश्वरच बसत नव्हता मापात
म्हणून त्याच्या नादाला कधीच नाही लागले

फक्त त्याला स्मरून ह्या घरात येताना

त्याच्याच नावाने ढकलले माप
आणि सर्वत्र विखुरलेले तांदूळ पहात
त्या एका मापाने
आयुष्यभर मोजत राहिले
स्वत:ला



## हा आज काही

हा आज काही माझ्या आयुष्यात असत नाही

मी एकतर भूतकाळात
किंवा भविष्यात

स्वप्न आणि स्मृती
हा 'आज' दूषीत करणारा ताप मला सोसत नाही

पश्चाताप साचत जातो नाकात
शिंका येत जातात
डोकं ॲनासिनचा खोका मागतं

डोळ्यात स्वप्नांची जळजळ
युटोपिया मांडण्याची चश्मीश तळमळ
ह्या भविष्य पाहणाऱ्या उष्ण जळवा
डोळ्यातल्या डोळ्यात माझ्या दृष्टीचे गरम रक्त पितात
किती समजावलं
पण हे आजचं शव साकळतंच जातं माझ्या देहात

आत्महत्येचा मोह
आणि जगण्याची तमन्ना
ढोल वाजत राहतो फुफ्फुसाचा
श्वास तालबद्ध

वाटचाल कदम कदम
हा तृष्णांचा रीदम चवचाल
हालहाल करतो

कुणीच मदत करू शकत  नाहीये ह्या आजारपणात

सगळं जग पिवळं दिसतंय
आणि ही अहंकाराची कावीळ वाढतच चाललीये

ही अशी कधीपासून मी हॉस्पिटलात पडून असलेली
आणि रोज माझ्या आजचे प्रेत
माझ्यासमोरच नेले जाणारे

रोज मी ह्या तापात जळतीये
आणि रोज हा पिवळा फिनिक्स मला जिवंत करतोय

मरताना प्रत्येकवेळी माझा चेहरा वेगळा
आणि आजार मात्र तोच

मी पिवळेपणात नासत चाललीये
आणि माझ्या आतला फिनिक्स मात्र
चेहऱ्यांच्या नव्या नव्या गोवऱ्या गोळा करत
रोज पुनर्जन्माची होळी साजरी करतोय



## पाणी

'मी' नसतोच
असतो फक्त क्षण
आणि अवकाश
शरीराच्या आत

शरीराच्या बाहेर
त्वचेमुळे विभागलेली
आत काय चाललय
काहीच कळत नाही
जठर
हृदय
फुफ्फुस
लाखो करोडो गोष्टी
आपापल्या जागी नीट फंक्शन करत असतात
म्हणून आपण जिवंत असतो
त्यांचे फंक्शन 'मी' शिवायही चालू असते
बाहेरही असेच
नीट फंक्शन करणारे
कुणीतरी आपल्या शरीराइतकेच
नीट मांडून ठेवलेले
आणि न कळणारे
तेही 'मी' शिवायही चालूच असते
पाणी आत येते
पाणी बाहेर जाते
फक्त आत येताना ते असते
चांगले पिणेबल आणि शुद्धही
आणि बाहेर जाते तेव्हा
ते होते घाम आणि मुत्र

आपण जगण्यासाठी पाण्यासोबत
असे वास सोडत असतो
आणि पाणी तरीही
तहान लागली की
कसलाही वास मनात न ठेवता
आत येत असते



## कवी

मी ह्या जागेत आहे
आणि माझ्या गोव्याच्या जागेतही
माझी आई इथे माझ्या स्मृतीतही आहे
आणि गोव्यातही

तिच्या पदराचा वास
माझ्या इथल्या नाकात आहे
तिची झाडं मला इथून दिसताहेत
आणि ती आता घर झाडत असेल
असा अंदाज बांधून
मी ह्या इथं साळूता पाहतीये

माझी आई इथं जिवंत आहे
आणि तिथंही

आईला इथं न पाहण्याइतकी
मी द्रष्टी झालेली नाहीये
आणि इथून तिला तिथं न पाहण्याइतकी संतही

मी अद्याप माणूस आहे
आणि दोन्ही ठिकाणची काल्पनिक आई
ह्या क्षणात पाहण्याइतपत
मी लख्ख कवी आहे



## सामूद्रिक

माझ्या शरीरात मनात बुद्धीत
सर्वत्र फक्त कडवटपणा आहे

साऱ्या संबंधात मी लावून ठेवलय कडू कारलं
आणि लोक इमानानं त्यांची भाजी
मला बनवून पाठवतायत

मलाही आले होते मिठाईचे बॉक्स
पण माझा स्वभाव असा की
मी सत्यच बोलते डायबेटीसविषयी

खोटेपणाचा पदर घेणं मला जमत नाही
आणि पुरुषाचा इगो सॅटीस्फाय करणारं कुंकू
मी कधी लावत नाही
मी असते माझ्यासारखी
नैसर्गिक आणि बेमूर्वत

माझ्या भांडकुदळपणाच्या वावड्या सर्वत्र उडतात
पण कुठल्याच वावडीला कापण्याइतका वेळ
माझ्याजवळ नसतो

बकबक करणारे लाखो कावळे उडून जातात छपरावरून
बकाबका गॉसिप खाणाऱ्या बकासूरांच्या फौजा
ये जा करतात दारावरून

पण माझ्या जीभेची सॅण्डल ताठ आहे
तिची पाणीदार चाल वहीवाट आहे पाण्याची
कडवटपणाच्या कित्येक कडेकोट करणाऱ्या लाटा
माझ्यातून उसळल्या तरी
निखळपणाच्या समुद्रात मी पोहतेच आहे बिनधास्त

गोड्या पाण्याचा स्विमींग टँक मला मानवत नाही
कडूनिंबानं आंघोळ केली की मला समुद्रच लागतो

समुद्राच्या प्रेमात पडलेली मी ही अशी अस्सल सामुद्रिक बाई
पाण्याचा कड घेणारी स्वत:चा वट मीठासारखा ठेवणारी

माझ्यात उगवणारा आणि मावळणारा सूर्य
सत्याचा असावा
एवढंच समाधान
ह्या समुद्रात बुडून मरेन तेव्हा मला हवं आहे



## साखर

सर्वत्र कानठळ्या बसवणाऱ्या अफवा
सर्वत्र सत्याची अद्‌भूत साखर आहे
जी खाल्ली की सारं अस्तित्वच गोड होऊन जातं
सर्वच साखरेची खात्री देतायत
आणि मला अद्‌भूत साखर अस्तित्वात आहे की नाही
ह्याचीच शंका
ती अद्‌भूत साखर चाखली असं छातीठोकपणे सांगणारी व्यक्ती
मला भेटलेली नाही
मात्र साखर न चाखताच साखरेवर अवधूत श्रध्दा ठेवणारे
सगळीकडेच
अद्‌भूत साखरेचे कारखाने सर्वत्र
आणि सर्वत्रच अद्‌भूत साखर इनव्हीजीबल माणसासारखी

ती आहे असं गृहीत धरून
सर्वत्रच साखरेचं उत्पादन दाखवलं जातय
आणि लोकही म्हणतात अद्‌भूत साखर आहे

प्रत्येकाला त्या अद्‌भूत साखरेमुळे डायबेटीस तरी झालाय
किंवा लायबेटीस तरी

ऊस लख्ख दिसतोय
तो खात असलेलं पाणी दिसतंय
आणि अद्‌भूत साखर मात्र कुठंच नाही
हा माझ्या दृष्टीचा प्रॉब्लेम आहे की मेंदूचा

मला माहीत नाही

अद्‌भूत साखर आहे म्हणूनच उसात अवधूत गोडवा आहे
असं म्हणणारेही खूप
ऊसात अवधूत गोडवा आहे म्हणजे मुळात कुठेतरी अद्‌भूत
. ख्रर असणार
असं म्हणणारेही खूप
गेली कित्येक वर्षे मी ऊसाचे गरे तोडतीये
पण दात साफ होण्याखेरीज काहीही हाती लागत नाहीये

अद्‌भूत साखर खाऊन अवघेचि गोड झालेल्या
संतांच्या अवधूत कथा
मी रोज ऐकतीये
आणि माझी जीभ अद्‌भुत साखरेच्या शोधात
स्वत:लाच थोडी थोडी निर्गोड करत फस्त करत चाललीये

गेली कित्येक शतके
माझ्या जीभेवर अद्‌भूत साखर नाही
आणि लोक
तिळगुळ घ्या गोड बोला म्हणत
नुसताच हातावर हात ठेवून जातायत
गेले कित्येक जन्म
मी ही अशी माझ्यावर आलेली संक्रांत सोसत
माझ्या मकर राशीत बसून आहे.



## ट्रॅफिक

परंपरा सगळंच गिळून टाकते
म्हणून काय नव्यात मी उभीच राहू नये

नवीन जमीन शोधली
की कॉन्ट्रॅक्टर पोहचलेच पौराणिक विटा घेऊन
आकाशात उड्डाण केले
तर साक्षात हनुमानउडीच आडवी

सगळ्या कणांत जुन्याचे दाणे पेरलेले
आणि शेतात इतिहासाची शेकडो बाजारबुणगी उभी

सगळ्या मेंदूचा अंत घडवावा म्हटला
तर मेंदूच स्वत:चा सगळा चेंदामेंदा हप्त्याहप्त्याने देऊन
नवतेची नवीन भांडी विकत घ्यायला टपलेला
नवता काय भांड्यात मावावी
एवढी छोटी गोष्ट आहे ?

भांड्याला भांडं लागलं की
फुटत असतीलही काहींच्या नवता
आणि आवाजही येत असतील नवे नवे
पण मला त्यांचं काय ?

मला हवीये नवता जी शांतता कम्पोज करेल
माझ्या आत कायमची

कधीपासून नव्या नव्या काता टाकून
परंपरा मला भुलवतीये
आणि मी तिचा कात बदलणारा रिमोट
हातात घेऊन
हा कातींचा ट्रॅफिक कंट्रोल करतीये



## आजोळ

आजोळविषयी फार चांगलं बोलण्याचा प्रघात
म्हणून मी जीभ पिरघाळून खुंटीलाच बांधली आजोळाबाबत
माझ्या फीट खांद्यावर आजीच्या दंतकथा
कधीच बसल्या नाहीत नीट
तिच्या प्रेमाचा चन्द्र
कधीच माझ्या ओटीपोटीत नाही उगवला
त्यामुळे माझ्या तिथ्थ्यावर पोर्णिमेवर अमावस्येवर
तिच्या मायेची साय पडली नाही कधीच

माझी आजी होती एक आत्मकेन्द्रित बाई
तिने माझ्या आईला पाठवून दिले एका दूर आदिवासी गावात
तिला अपशकुनी ठरवल्याने
माझी आई काटेकुटे तुडवतच
शांतादुर्गेसाठी गजरे ओवत बसली
माझ्या मावश्या जेव्हा घरात आंबे खात होत्या
तेव्हा माझी आई घराबाहेर फणस विकत होती
माझी थोरली मावशी होती एक कावेबाज स्त्री
दमा झालेली खोकत खोकत चालणारी टोकदार बुद्धी
तिने खोकत खोकतच माझे आजोबा वश केले
आणि आपल्या लंगड्या बहिणीला पाठवून दिले पागलखान्यात
ती वेडी आहे हे सिद्ध करून
सर्वात धाकटी पागलवणे कठीण म्हणून
बन्द केले तिचे मुबलक जेवण
आणि तिच्या नवऱ्यानेच जेव्हा धाकटीला अन्नाची लाच देत
फशी पाडले
तेव्हा धाकटीलाच चढवले व्यभिचारात फाशी
माझ्या वडीलांनी जेव्हा स्वत:च्या घरासाठी पाठवले पैसे
तेव्हा त्यात स्वत:चेही घर बांधून घेतले आजोळाने
आवयाचे आपल्या मोजत वासे
सरते शेवटी सगळ्या इस्टेटीवर नागासारखी बसली
थोरलीची फणी

आणि धाकटी तिची धुणी धुत धुत मरण पावली
तिचे मरण आजही चर्चा होणारे रहस्य आहे

माझ्या आईच्या स्वप्नात आजही तिच्या दोन्ही बहिणी येतात
आणि थोरलीचा सूड घे म्हणतात
पण तरीही माझी आई
थोरलीशी हात मिळवते
आपली माया तिच्याकडे वळवते

खरेतर माझ्या आईला
कसलाही हक्क उरलेला नाही कायदेशीर
आणि तरीही ती माझ्या आजोळी जाते
आणि आयुष्यात हरवलेलं काहीतरी शोधत राहते

तिचे भरून येणारे डोळे मला उदास करतात
पण तरीही ती तिथे काय शोधत असते
हे मला तिने आजतागायत सांगितलेले नाही.



**ओपी** (ओ. पी. नय्यर)

तू मला ओळखत नाहीस
पण माझे कान तुला ओळखतात

आईये मेहरबाँ बैठिये जानेजाँ
कळू लागल्यापासून मेहरबाँ होऊन
तुझ्या मदमस्त सुवासात मी बसून आहे

सुरात दारू भरून संगीताची मधुशाला उघडणारे तुझे हात
माझ्या कानांना पंजाबचं ठेकेदार अमृत पाजताहेत

सज्जादचे ओघळून गेलेले मणी

अनिल विश्वासचा बन्द मन्द श्वास
क्रियेटिविटीच्या कैफात झोकात दौडणारा तुझा इगो
आणि भुसा भरलेलं आयुष्याचं नोटेशन नाकारण्याचा तुझा मद

स्वत:च्या अटीवर जिथे कट जगतात
तिथे तुझा मठ तू ताठ ठेवलास

तुझ्या जलतरंगाचा सबरंग कापूस वाजवतोय रेशम
एक नशा भरलेला सरगमी बाम हलकं करतोय माझं डोकं

एक डिव्हाईन वाईन थेंब थेंब त्वेचवर मुलायमतीये
एक हिचकीची व्हिस्की स्तनांना टीचकी मारतीये
तुझी प्रेयसी तुझ्या गळ्याचा लळा माझ्या मळ्यात उतरवतीये
आणि माझं दगडी मांस हळूहळू मद्यात कनवर्ट होतय

मला पुन्हा एकदा तुझी दीक्षा मिळालीये
आणि वेदनेनं बनलेलं माझ्या आयुष्याचं भिक्षापात्र
पुन्हा एकदा हळूहळू गोडव्यानं भरत चाललय
तू कॅसेटमध्ये पृथ्वीसारखा फिरतो आहेस
आणि मी साखर कातत गोडव्याचे शेले विणते आहे



## घर

हा उजव्या कोपऱ्यात ठाण मांडून बसलेला कम्प्युटर
हा डाव्या डोळ्यात रेंगाळणारा तुझा पुरुषी चेहरा
हा खिडकीलगत चॅनेल बदलणारा टिव्ही
ही दोन्ही कानात रेंगाळणारी तुझी कोल्हापूरी शिवी
ही सफद पोशाखातली पुढारी स्टुलं
ही माझ्या कानात हलणारी तुझ्या मोहब्बतीची डुलं
ह्या कसल्याही सत्ता नसलेल्या खूर्च्या
ह्या शरीरावर रेंगाळणाऱ्या तुझ्या भेटी खालच्या आणि वरच्या

हा रोज रात्री झोपेत मला खांदा देणारा कॉट
ही माझ्यात ठणकणारी तुझ्या बेरुखीची गाठ

माझं सगळं घर असेम्बल झालय ह्या एका क्षणात
कोण कशात वावरतय काही कळत नाहीये
एक की आपसुख दाबली जातीये
एक पडदा आपोआप उघडला जातोय

मी कधीपासून घरावर कंट्रोल करण्याचा प्रयत्न करतीये
आणि तू घराचा रिमोट गिळंकृत करून बाहेर निघून गेलायस



## कम्युनिझम

कम्युनिझमच्या सोळाव्या मजल्यावर तू राहतोयस
कम्युनिझम पृथ्वीपासून कितव्या मजल्यावर आहे
मला माहीत नाही
तू हस्तिदंती मनोऱ्यात राहतोयस
असं म्हटलेलं तुला आवडत नाही
आयफेल टॉवर म्हटलं तर
तू कदाचित आत्महत्याच करशील

कामगारांसाठी तू गाळत असलेला घाम
सोळाव्या मजल्यावरुन खाली
स्केटींग करत असल्यासारखा येतो
तुझ्या लाल मिरचीला
अजूनही चायनीज भोजनाची चव
आणि तुझ्या जागतीक डोळ्यांचा
आजही ग्लोबलायझेशनला असलेला विरोध
तुझ्या विकासाच्या आड येतोय
हेही तुला कळत नाही

चायना बदलला
रशिया कोसळला
तरी गिरे तो भी टांग उपर म्हणत
तू सोळाव्या मजल्यावर

तू वयात आलायस
तुला मिश्या फुटल्यायत
की तुझी कातडी जळत चाललीये

तुझ्या बिल्डिंगवरचं घड्याळ बन्द पडलय
आणि काळ तुझ्या पायाखालचे पंधरा मजले
अलगद काढून घेऊन
पुढं निघून गेलाय

तू हवेत सॅटेलाईटसारखा तरंगतोयस
आणि मी तू कधीही स्कायलॅबसारखा कोसळशील म्हणून
माझ्या पदरात समुद्र घेऊन
माझे डोळे पुसतीये



## मी युद्धात मारला गेलोच तर

मी युद्धात मारलाच गेलो
तर रडू नकोस
विधवा झालीस तर ती तुझी जबाबदारी नसेल
दुसऱ्या लग्नाचं प्रपोजल आलं तर आनंदानं स्विकार
ज्यांना आक्षेपार्ह वाटेल त्यांना म्हणावं
सैन्य निर्माण करावं लागणार नाही अशी शांतता निर्माण करा
म्हणजे कुणाचाच नवरा हकनाक मरणार नाही
टिव्हीवर फेअर ॲन्ड लवली नंतर
तुझं दुःख दाखवतील

तेव्हा मेकप करु नकोस
जशी दिसतेस त्यात ताठ रहा
कॅमेरा एकतर बाईचे तिच्या दु:खाचे
कपडे काढतो किंवा मेकप चढवतो
तू तूझ्या दु:खी साडीतच
चॅनेलची माडी चढ
नाना पाटेकर भेट घेईल
आमीर खान भेट घेईल
आमदार खासदार भेट घेतील
पण तू युद्धाला ग्लॅमर नको चढवूस
समाजाला काय
तो माझ्या मृत्यूलाही आयटम साँग बनवेल
आणि दर पंधरा ऑगस्टला वाजव वाजव वाजवेल
माझा देह एक नॅशनल युनिफॉर्म आहे
आणि माझी ड्यूटी देशभक्तीचा क्लोरोफॉर्म
माझ्या निर्बुध्द वीरमरणामागं असेल
एक पॉलिटीकल ऑपरेशन
सत्ता प्रसवणारं आणि सत्ता सांभाळणारं
हे आत्ताच नीट समजून घे
तू शांततेचं कबूतर उडव असंही मी म्हणणार नाही
आणि मुळात उडवलस तरी कुणी लक्ष्यही देणार नाही
सत्तेला रक्ताची चटक आहे
आणि सत्यासाठी चटका
तेव्हा डोळे पक्के उघडे ठेव

मी मेलोच तर मला
माणसासारखाच निरोप दे
चितेत जळून संपलो की
आठवणीतही जाळून टाक
म्हणजे वीरपत्नी म्हणून किंवा दुसऱ्याची पत्नी म्हणून जगताना
तुला चुकचुकल्यासारखं वाटणार नाही

आणि यदाकदाचित माझ्या मित्राचा
दुखवट्याचा फोन येईल तेव्हा
तू जिवंत असल्याचा सूक्ष्म आनंद
तुला नीट सेलिब्रेट करता येईल

युद्ध माझ्या मृत्यूनंतर संपेलच असं नाही
कदाचित माझ्या मृत्यूनंतरच
तुझ्यासाठी ते खरखुरं सुरु होईल

सज्ज रहा



## मॉर्निंग टी

प्रथम तुझं शुगरकोटेड जॅकेट उतरवलं
मग टी शर्ट
मग मिल्की बनीयन
मग नजरेच्या चमच्यानं तुला ढवळला
आणि डोळ्यांच्या शेगडीवर ठेवला

मग प्रथम लाज जाळली
मग कपडे
मग संस्कार

तुला तापवला
बेडमध्ये ओतला
मग ओठापाशी आणला

चुंबनाची फुंकर मारली
आणि तुला घोटाघोटाने
आख्खा पिऊन टाकला

मी आज दिवसभर फ्रेश दिसत होते
त्याचं रहस्य हा मॉर्निंग टी आहे



## जनावर

माणसांना जनावर समजलं की
लढाई सोपी होते
जगणं सोपं होतं
जनावरं हाताळायला सोपी असतात
त्यांना मारताना बुद्ध आठवत नाही
की युद्धाचे परिणाम चिंताग्रस्तही करत नाहीत

माझा बॉस आहे एक शार्क
त्याला दूरचं दिसत नाही म्हणून
सत्तेचा एक चष्मा चढवलाय त्यानं
ऑफिस नावाचा एक महासागरच मांडलाय त्यानं आसपास
क्रेडीटचे मासे गिळत पाण्यात कसं पोहायचं
त्याला चांगलं कळतं
सर्वांना आपण चांगलं दिसावं असं नजरेत सततचं ऑब्सेशन
आणि स्वत:च्याच इमेजचा धाक
स्वत:चा राग मॅनेज करण्याचं अफाट मॅनेजमेन्ट
आणि एक डरपोकपणा पोक आलेला
त्याला हवं असतं माझं चुंबन गच्च
आणि माझे ओठ तर बोलायलाही तयार नाहीत
जिथे शब्दांनाही शिसारी
तिथे आख्ख्या कवितेने कसे जावे ?

सरकारी लांडग्याची गोष्टच वेगळी
शेळी पांघरून मांसाहार करणारे जनावर
चांगले पालक
आणि शक्य तेवढे बायकोशी एकनिष्ठ

एक असाधारण इंटरनेटींग जातभाईशी
आणि सेटींग करण्यासाठी सदैव
सज्ज ऑफिशियल सज्जाची कोठी
वाजत गाजत कुणाचेही डोळे काढून
पन्हाळ्यावर मिरवतील
आणि डोळ्यांसकट खाऊन पिऊन
त्याला धर्मवीरही ठरवतील
एक अदृश्य सही त्यांची प्रत्येक नोटेवर
आणि प्रत्येक ऑफिसमध्ये त्यांनी मोडीत काढलेला गांधींचा चष्मा

सापांशी माझा परिचय फार लहानपणापासूनचा
माझा बाप जेव्हा आक्टोपससारखा वावरायचा
तेव्हा ते पाण्यातून भेटायला यायचे
नंतर जेव्हा मी इच्छाधारी नागिणीसारखी वावरायला लागले
तेव्हा ते जमिनीतून उगवायला लागले

हल्लीहल्ली ते उडतातही असं माझ्या लक्ष्यात यायला लागलंय

लहानपणी मी किती खूष होते पुंगीवर
मला वाटायचं मी ती वाजवते म्हणून हे डोलतात
पुढे कधीतरी हे त्यांचं नाटक असल्याचं कळलं
लहान मुलीला खूष करण्याची कौटुंबिक लकब
त्यांचे दंश आणि त्यांचे विष
मी विषकन्या बनू नये म्हणून
मी त्यांना दूर ठेवायला शिकले
तर ते कोणत्याही जनावराचे रूप घेऊन
पुन्हा माझ्याच अंगणात

वाघांविषयी मात्र मी नेहमीच प्रसन्नचित्त
कालीसारखं त्यांच्यावर बसून फिरणं मला आवडतं
त्यांच्या मिश्या पिळायच्या
आणि त्यांचं चुंबनही घ्यायचं

म्हणजे ते बाईलवेड्या नवऱ्यासारखे वागायला लागतात
फक्त त्यांचा अंगार भंडाऱ्यासारखा अंगाला लावता आला पाहिजे
कुंकू लावणाऱ्यांना ते अंमळ कठीणच

एक एक जनावर हाताळत
मी ही अशी हिंडतीये
आणि माझ्या मैत्रिणी म्हणतात
बाईमाणसानं जरा जपून असावं ह्या पाशवी जगात

मी ही अशी बाईपण जपत जपत
ह्या जंगलातून कविता गुणगुणत चाललीये



## ज्वालामुखी

ज्वालामुखी टाईप करत सुटलाय मृत्यू
त्याची पिवळी आग मला फोन करतीये मोबाईलवरून
आणि मी बसलीये साहसाच्या सीडीत आयुष्याला वेटोळे घालून
विचार करत कोणता ग्लास ऑफर करावा ज्वालामुखीला
माझ्या शरीराचा

ज्वालामुखीचे ढग जमा होतायत तीस किमीवर
स्फोटांच्या फुटतायत शेंगा
आणि दाणे गिळंकृत करत चाललेत
वाटेत जे जे येतय ते ते

माझ्या कानात एक सायंटिस्ट काडी घालून
चेक करतोय माझी श्रवणक्षमता
त्याचा चष्मा वाढवतोय पहाडीचा फक्त नंबर
माझ्या कपड्यात वाजवतय चर्च एक घंटा पांढरी
आख्खं गाव गिळंकृत केलं जातय पिसाटीत
माईकमधून एक बाई तिचा आवाज करतीये एन्ट्र

नकाशे आणि लोकसंख्या एकमेकाचं तोडतायत मांस
जिज्ञासेचं हेलीकॉप्टरही कोसळतय लाव्हात
त्याचा ठिपका मला दुरून दिसतोय
माझ्या कॅमेऱ्यात फडफडतोय ज्वालामुखीचा सेक्सी चेहरा
एक स्टेपलर दाबून त्याला स्टेपल करण्याची उबळ
एक पांढरी कळ जळजळीत

लाव्हा सगळं सोबत घेत वहात चाललाय
आणि मी ज्वालामुखीच्या डोळ्यात डोळे घालून
त्याला माझ्या शरीराचा ग्लास करतीये ऑफर

माझा मृत्यू टाईप करत तो येतोय माझ्याच दिशेनं
आणि मी जगातल्या सर्वात देखण्या पुरुषाबरोबरचं डेटींग
नीट शूट व्हावं म्हणून कॅमेऱ्यासमोर उभी आहे
कॅमेरा ऑन करुन



## शूटींग

ह्या ओसाड गावात
मी पाहतीये एक अस्पृश्य स्त्री
एका सवर्णाला आंघोळ घालतीये
त्याला ते पाणी सेक्सी वाटतय

दुष्काळाची धूळ उडतीये
पण आंघोळीची चैन परवडण्यापुरती जमीन व विहीर
ह्या गावांत ह्या सवर्णाकडं आहे
त्याच्या अहंकाराची शेंडी ताठ आहे
आणि त्याच्या घरात टिव्ही येऊनही
त्याने ती तशीच राखलीये

त्याची गोरी कातडी मनुचे थर बसून

जाड झालीये
आणि ही अस्पृश्य बाई त्याला आंघोळ घालतीये
त्याला दिवसा तिची छायाही नकोय
आणि रात्री कायाही चालेल
त्याच्या बायकोला ते माहीत आहे
पण ती रोज मुकाट स्वत:ची आंघोळ स्वत:च करते
स्वत:साठी दुसरा पुरुष शोधण्याइतकी
ती मुक्त झालेली नाहीये

स्त्रीला तिचा शत्रू माहीत आहे
आणि तरीही ती त्याला आंघोळ घालतीये
खरतर हे धाडस आहे
आणि विवशताही
कित्येक शतकं आंघोळ करूनही
सवर्णाची एकही पिढी शुद्ध झालेली नाही
मनूचा चिखल ती आजही मिरवतीये

मी बाईचं काळीज शूट करतीये
पण तिला त्याची कल्पना नाहीये

एक डास गुणगुणतोय
त्याला अस्पृश्य आणि सवर्ण हा फरक कळत नाही
तो कुणाचंही रक्त शोषेल
आणि आला दिस रक्तावर ढकलेल

मी क्लोजपमध्ये डासही घेऊन ठेवतीये

सवर्ण अनावर होऊन जनावर झालाय क्षणभर
पण कॅमेरा आहे हे कळून येताच
मानभावी माणूस होत हसतोय
त्याचे निर्लज्ज दात भक्कम आहेत

मी कॅमेरा उचलून चाललीये

मी खरंतर दुष्काळ शूट करायला आले होते
आंघोळ शूट करून निघालीये

सवर्ण आणि अस्पृश्य दोघंही हात हलवून मला निरोप देतायत
त्यांना वाटतय मी त्यांना कॅमेऱ्यात जाता जाता टिपतीये

त्यांची भूक कॅमेऱ्यात मला टिपता आलेली नाहीये
आणि ते चक्क हसतायत

हा देश अजब आहे
इथे माणसे भुकेल्या पोटीही हसतात.

मीही हसत हसत गाडीत बसतीये
मी का हसतीये कशाला हसतीये मला माहीत नाही

त्यांच्याप्रमाणेच माझंही अज्ञान आता खेळकर झालंय



## ते शेत तिचं नाहीये

ते शेत तिचं नाहीये
तरीही ती शेतात राबतीये
फुलं तोडताना
तिला मजुरीचा आवाज येतो
आणि ती क्रूर होते

तिचं नेसू
तिचं हसू
दोन्हीही फाटलेली असतात
आणि ती राबताना सारा दोष
आपल्या फाटक्या हाताला देते

तिचे डोळे खुरप्यासारखे आहेत
जमीन डोळ्यांनी खुरपताना
तिची दृष्टी उदास असते

मालकाला सुचलेले प्रयोग
आजकाल सर्वत्रच कोसळतायत
हे तिला मालकाच्या चेहऱ्यावरून कळत असतं

मातीच कोसळत असेल
तर घरं तरी कशानं बांधायची

ऊस खपेनासा झालाय
म्हणून सूर्यफुलं काढली मागल्यावर्षी
तर ती बाजारपेठेत उगवण्याआधीच मावळली

खरंतर पांढरी आणि पंढरी
काळी आणि तांबडी
सगळ्याच आजकाल निराश आहेत

पाणी नेमकं कुठल्या वळणानं चाललय
हे पाण्यालाही कळेनासं झालंय
आख्ख गाव वाळत चाललंय
घश्याला पडलीये ओरड
आणि घसा पार बसत चाललाय

घोषणा द्यायलाही गळ्यात आवाज शिल्लक नाही
ह्या अवस्थेतच
तिला कुणी सांगितलं
''आजकाल जमीनबी मारकिटात हुबी हाय''

जर जमीन मारकिटात हुबी

तर जमिनीत हुब्या असलेल्या आपन
कुठं हुब्या होत
ह्या प्रश्नानं ती स्तब्ध आहे

हात फुलं तोडतायत
आणि ती शेतात वाळत चाललीये



## विठ्ठल

मला विठ्ठलाचा काडीचाही अनुभव नव्हता

ना त्याने कधी माझे दळण आणले
ना कधी त्यानं माझा मिक्सर लावला
ना कधी त्यानं टीव्ही ऑन केला
ना कधी माझ्यासाठी चहा आणून दिला

बुडत्याला ज्या काडीचा आधार
ती माचीससकट सगळी जळलेली

तो घरात नाही आला म्हणून
मीच पंढरपुरला गेले
तर तो नुसताच मख्ख उभा

ना त्याने शेकहँड केला
ना मला नमस्कार
तो आपला दगडीच
रुक्मिणीला तर स्त्रीमुक्तीची काहीच कल्पना नसावी
त्यामुळे तीही पतीपरायण बायकोसारखी
त्याच्या शेजारात तंगड्या घालून उभी

ती तरी बोलेल म्हणून माईक समोर धरला

तर तीही आपली दगडासारखीच

दगडावर डोकं कोण आपटणार म्हणून मी परतायला लागले

परतीच्या वाटेवर त्याच काया
आणि तेच रक्तबंबाळ पाय

दोन दगड पाहून डोळ्याच्या खोबण्या होतील म्हणून
मी माणसांकडे काळजीपूर्वक पहायला लागले
तर तीच विठ्ठलापेक्षा जास्त जिवंत वाटली

कॉरीडॉरमध्ये पोहचले तेव्हा
डोळ्यात माणसे स्थापन झाली होती
आणि विठ्ठल ठिसूळ ठिसूळ होत
नाहीसा होत होता.

घरी शिरताक्षणीच
मी विठ्ठलाच्या नावाने आंघोळ केली
आणि एकदम फ्रेश झाले

प्रवासाचा सगळा शीण जावा म्हणून
फक्कड चहासाठी मस्त आधण ठेवलं
लायटरने गॅस शिलगावला
आणि माचीससकट जळून गेलेली एक एक काडी
शांतपणे खिडकीतून घराबाहेर कायमची फेकून दिली



## तीन मित्र

तीन मित्र आले
तीन मित्र निघून गेले

एक काव्यवाचनाचं डील
नको असलेलं
एक हे लोक नकोत असा फील
तोही नकोसा

एका गळात मी परफेक्ट अडकवली गेलीये
आणि माझा मासा झालाय हे ओळखून
तिघंही मत्स्याहाराची तयारी करत

तिघंही उत्कृष्ट कूक आहेत म्हणे
पहिला हॉटेल मालक उत्कृष्ट स्वयंपाकी असल्याची डींगच मारत होता
त्याला एकदा हींग लावून विचारायला हवं
दुसरा शेतकरी
काय कसत होता कोण जाणे
पण माझी जमीन मात्र त्याला पाहून
सारखी कूस बदलत होती
तिसरा पत्रकार
भाषेत लोणच्यासारखा मुरून गेलेला

तिघंही निघून गेलेत
आणि घराला कवितेचा असह्य वास येतोय

कविता माझ्या घरात कधीच इतकी नासली नव्हती



## उपदेश

नाव बदल लाव कुंकवाचं रक्त घे श्वास सासरच्या हवेचा
सासूला नशीब जोडून कर प्रणाम
सासऱ्याच्या पायावर ठेव भटकंती

हाऊसिंग कंपनीची प्रेशिअस शेअर हो देवघरात ट्रेडीशनल प्रेअर
पार्वती म्हणतील ते सोस लक्ष्मी म्हणतील ते सोस पोस फीगर
छत्तीस चोवीस छत्तीस गुण जुळले ह्यात मान आनंद
निष्ठेचा गुलकंद तयार कर रोज रात्री स्वत:ला विक
नवऱ्याला संभोगाची दे कीक नितंबाना फुटबॉल समज
बेंड देम लाईक बेकहेम इन फ्रंट ऑफ युवर हजबंड
नवऱ्याची वक्षांतरे सहन कर डावी आणि
उजवी त्याची हस्तांतरे अखेर मान
त्याच्या हाती टिव्हीसारखी प्रक्षेपित कर
पार्टीत इमेज डोळ्यांचा FM
अचूक वाजव ओठातून लिपस्टीकची
सेक्सी दारू पी नवऱ्याला पाज
क्यूँ कि सॉस भी कभी मधली बहू म्हणून गाज
योग्यवेळी वजन शिफ्ट कर
नवऱ्याला स्तुतीची लिफ्ट दे गीफ्ट हो बाळंत हो संत होशील
मुले वाढवता वाढवता संगणक शिक मतिमन्द हो पाणी भर
तुकोबाच्या गाथेसारखी पाण्यात भीज आणि कोरडी सापड
पाण्याची टाकी बसव वॉकी टॉकी हो सौंदर्य साबण वापर
ऐश्वर्यासारखी दीस करीनासारखी दीस लारासारखी दीस
सगळी आसने आसवात बसून पाठ कर आजारी पड
पेनकीलर्स घे स्वत:ला मार जग आणि जगव वाच आणि वाचव

पानी तेरा रंग कैसा
जिसमे जो मिले वैसा
पाण्यासारखी सर्वत्र वहा
दिल्या घरी मुली जिवंत रहा



## वास्तू

वास्तू उताणी पडतीये माझ्यासारखी
कुणी तरी पदर खेचतय
आणि तिचा पाय घसरत चाललाय

एक हिरवे कबूतर हवेत फडफडतय
नाहीसं होतंय
बहुधा त्याला प्रदूषण गिळून टाकतय

एक भगवा धुरळा उडालाय भगव्या पोटातून
सर्वत्र धूळ भगवी
आणि जय राम श्रीरामच्या नजरशून्य घोषणा

एक सोमनाथच्या सावलीत झोपी गेलेली दंतकथा
खडबडून जागी होतीये
तिचे दात वर्तमानात रुतत चाललेत
ती ह्या क्षणापासून मांसाहारी होतीये

वास्तू
जी वर्षानुवर्ष बुरख्यात होती
चकीत झालीये
आपण रस्त्यावर कधी आलो ह्या विचाराने

तिला ती हिंदू होती की मुस्लीम
तेच आठवत नाहीये
अंगावर साडी
चेहऱ्यावर बुरखा
तिच्या कपाळावरचं कुंकू कनफ्यूज झालंय
कारण त्याचा रंग हिरवा आहे

दोन्ही पुरुष तिला टकमक पाहतायत
एकाला ती बुरख्यात हवीय
दुसऱ्याला साडीत

तिला नागडी करायचय
ह्यावर चारही डोळ्यांचे एकमत आहे

वास्तू घाबरलीये
आपण चोळी घातली होती की नाही
आपण परकर घातला होता की नाही
की आतून आपण नागडेच आहोत
तिला काहीच आठवत नाहीये
समोर लाखो पुरुषांची गर्दी आहे
आणि आपणाला त्यांच्यासमोर नंगं केलं जाणार
ह्या भयानच ती थरकापतीये

तिच्यावर रोखलेले कॅमेरे
आपलं टोक
पुरुषाच्या लिंगासारखेच ताठ करून उभे आहेत

एक आसमंत आहे सर्वत्र तिच्या नावाचा
जो साजरा करतोय
तिच्याच नावाने एक उत्सव
ती देवी आहे की वेश्या
तिला कळत नाहीये काहीच

ती उभ्या उभ्या कोसळतीये
आणि तिला कोणीच आडवं होऊ देत नाहीये

तिच्या मागे टेकताहेत असंख्य टेकू
आणि आसपासचा प्रत्येक जण तिच्यात वाकून
स्वत:चं पुरुषत्व ठीक करून घेतोय

आतापर्यंत एम. सी. सुरु झालेल्या प्राचीन बाईसारखी
कोपऱ्यात बसून असलेली ती
एकाएकी पब्लिक फीगर झालीये

प्रत्येक गल्लीत प्रत्येक नाक्यावर
तिच्या तारुण्याची जोरदार चर्चा आहे

आणि ती आपलं फुटलेलं काचेचं भांडं पहात
स्वत:च्याच काचांत रक्तबंबाळ होतीये

तिचा रक्तस्त्राव सुरू आहे
आणि तिच्या आसपासचा प्रत्येकजण
तिचे रक्त हिरवे आहे की भगवे
ह्यावर चर्चा करण्यात मग्न आहे



## कवी

एक उत्तर आधुनिक अराजकच मांडलय माझ्या भवताली
आणि कविता खपताहेत फ्री कमोडीटीसारख्याच

कवी बाजारातच उभे आहेत
सगळेच स्वत:चं मार्केटींग करायला उत्तम शिकलेत

कवी हल्ली मोर्चे काढत नाहीत
कवी टोळ्या चालवतायत

एक माफियागिरी चालू आहे कवितेच्या पोटात
आणि भाई लोक जाहिराती मिळवण्याच्या स्कीलवर
संपादक झालेत

कवी महाकवींनाही ट्रान्सलेटर म्हणून मॅनेज करू शकतात
महाकवींची क्वेस्टही मॅगेझिन चालवण्यापुरती मर्यादित झालीये

कवी राजरोस दरोडा घालतायत दुसऱ्यांच्या कवितेवर
आणि चोरी केलेला माल स्वत:चं लेबल लावून खपवतायत
ओरीजनल बाजारात येण्याआधीच

कवी उल्हासनगर असोसिएशन चालवताहेत
आणि यु. एस. ए. ला जाण्याची स्वप्नही पाहताहेत

कवी इंग्रजी शिकताहेत
स्वतःच्या मुलांना इंग्रजी शाळेत घालतायेत
आणि वर पुन्हा मराठी टिकवण्याच्या परिषदेत
उसाहाने भागही घेतायत

कवी दांभिक होतायत राजकारणी होतायत
आणि कवितेतून नैतिकतेचा उपदेशही करतायत

कवी पटवतायत की शेवटी कवीही माणसंच आहेत
आणि कवी कवितेतही करीअर करू शकतात.
कवींनी कवितेचा कवीचा अर्थच बदलून टाकलाय
कवींना कळून चुकलय
भाषा आणि कामाठीपुरा ह्यांच्यात फरक उरलेला नाहीये

कवींनी स्वतःला झालेला एड्स सर्व भाषेत वाटून टाकलाय

कवींचा मृत्यू निश्चित झालाय
आणि म्हणून कवी आजकाल कंडोमच्या जाहिराती लिहितायत

चांगली कविता आजकाल
कवींपासून कंडोमच्या अंतरावर उभी आहे
तिने कवींना कल्पना न देता
कवीपासून स्वतःला सुरक्षित ठेवलय

कवितेचे हे बायकी कसब सनातन आहे
आणि कवी अशाश्वत असल्याने
त्यांना ह्याही शतकात हे माहीत नाही.



## घर - २

कितीही बाजारात फिरले तरी
शेवटी परतणार घरातच

हे बाजारातील टोमॅटो
हा टोमॅटोतील बाजार
शेवटी माझ्याच पावभाजीत टोमॅटीक शिजणार
ही सर्फची सफेदी शेवटी
माझ्याच कपड्यात चमकणार

तुम्ही ग्लोबल बाजार कितीही एक्स्टेन्ड करा
शेवटी त्याला माझ्या घराच्या आतच सेटल व्हायचं आहे
म्हणून ह्या मार्केटमध्ये मी बिनधास्त हिंडतीये

माझे घर तुमच्या बाजारापेक्षा मोठेच आहे



## अपयश

एक निश्चित अपयश
बांधून ठेवलय मी दारात
वारा आला की अपयश हलतं

माझ्या आसपास आहे यश मागणारी हवा
आणि मी ही अशी बालकवींचा पारवा झालेली
पायापर्यंत चालत आलेल्या यशाच्या शक्यता
पायदळी तुडवून
अपयशाकडे मला चालवत न्हेणारी एक चेटकीण
माझ्यातच लपलेली आहे

तिच्या ब्लॅकमॅजिकपुढे

माझ्या हाऊ टू वीन सवयी नतमस्तक होतात
आणि मी तिची हस्तक होते
ती डिक्टेट करते
मी नको त्यावेळी सत्य बोलते
ती डिक्टेट करते
मी नको त्यावेळी खोटं बोलते
माझ्या बोलण्याचा रंग लाल होतो
माझी जीभ शिव्यांचा गुलाल उधळते
आणि जमत आलेलं डीलिंगचं पान
तोंडातल्या तोंडात नासून जाते

एक आत्मनाशाची ओढ आहे
माझ्या पाठीच्या मुळाशी
आणि खाईन तर तुपाशी म्हणत
माझ्या पाठीचा कणा
नको त्यावेळीही ताठच राहतो
माठामागून माठ फुटत राहतात
आणि अहंकाराचे दही अंगभर सांडत जाते

तिच्या ब्लॅकमॅजीकमध्ये माझं आयुष्य
कोडासारखं फुटत चाललय
आणि माझी पावलं
पांढऱ्या पायाची होत चाललीत

आता अशीच चालत चालत एकदिवस
थेट मृत्यूत जाऊन कायमची जळेन
आणि दाराला लटकलेली ही अपयशाची बाहुली
वाऱ्यात हलत हलत
माझ्या डोळ्यात कायमची विझेल.



## मांजर

एक पुरणपोळी तिघीत
वाटून न खाण्याइतकी मी स्वार्थी

ह्या गोड चवीची आसक्ती अशी की
मला विनोबाचं भान नाही
दोघींना टांग देऊन
दोन्ही हातांनी
ही पुरणपोळीची मॉंग
जीभ मटकावत मी पुरी करतीये
माझे दात दुखतायत
आणि तरीही मी अशी
ह्या चवीसाठी पिशी

एक पुरणपोळी खाणारी मांजरच
लपलीये म्हणा ना माझ्यात
जी खाऊनपिऊन
ह्या आत्मकेन्द्रितपणाच्या मिश्याही
घासूनपुसून साफ ठेवेल
आणि मी घरी पोचल्यावर
मांजरीची हत्या करुन काशीयात्रा केल्यासारखा चेहरा करून
माझ्या मैत्रिणींसमोर उदास उभी राहीन

त्या विचारतील
काय गं ट्रेनमध्ये काही
खाल्लीपिल्लीस की नाही ?
मी म्हणेन
''मांजर''
त्यांना काहीच कळणार नाही
आणि माझ्यातली मांजर
कसलाही आवाज न करता

ह्या सुसंस्कृत स्वयंपाकघरात
पुन्हा चुपचाप वावरायला लागेल



## डाटा

सगळा डाटा करप्ट होत चाललाय
पॉवर्टी लाईन नाहीशी होतीये
प्रॉपर्टी लाईनीत
टाईम्स ऑफ इंडिया काढत नाही पॉवर्टी सप्लीमेंट
भूक चॅनेलवरील चर्चेचा विषय बनतीये
श्रमाचं पोट गेलय खपाटीला
त्याला सक्तीची व्ही आर एस मिळालीये
प्रत्येक डोळ्यात साकळतोय तणावाचा एक अश्रू
ग्लोबलायझेशनचा समुद्र
उकळवत बसलाय आयुष्याचा नासलेला ढग
पाऊस पडेल न पडेल
पण विहीरीतून मात्र उगवतायत
कोकच्या बांधेसूद बाटल्या
लोकांना मिळत नाहीये प्यायला पाणी
आणि सर्वत्र उभे होतायत शुद्ध पाण्याचे मलखांब
म्युझिक आणि मनी
एकत्रच प्रसवतायत वासनेचं ग्लोबलायझेशन
व्हिजेंचे पीजे मांडतायत
कसं जगावं याचं बहुउपयोगी दर्शन
सगळे व्यास वाल्मिकी
सोप ऑपेरा लिहितायत कलियुगातले
आणि गुणाढ्यांच्या बृहत्कथा
ट्रान्सलेशनसाठी रांगा लावून उभ्या आहेत
डेल कार्नेगीनं सुरू केलय
मॅनेजमेंट युगासाठी फिटनेस शिबीर

नोटा वितळतायत काळाच्या फेक डोळ्यात
शेक देत

आता मृत्यू होईल तर तोही जागतिक
चिता जळेल तर तिचेही जगभर प्रक्षेपण

प्रसिध्दीची इतकी गॅरन्टी कुठल्या काळात होती भौ ?
अम्नेशिया मात्र सर्वच काळात होता

मी आताच लिहलेलं विसरत चाललीये
आणि तुम्ही काल काय झालं म्हणून मला काय विचारताय ?



## त्यांना वाटतंय

ॲनिमल प्लानेटवरील शहामृग चिंताग्रस्त आहेत
आणि मी डनलॉप सोप्यात माझ्या करमणुकीचं अंडं उबवत बसलीये

सोनीतली जस्सी चष्मा उडवत टीआरपी मिळवतीये
तिच्या चष्म्यात सर्व बायका विरघळत चालल्यात
लवकरच बायकांना तिचाही डायबेटीस होईल
आणि टीआरपीची कीडनी फेल गेली की
जस्सीला डायलेसीसवर ठेवलं जाईल

टेन स्पोर्टस्‌वर फक्त झळकतय क्रिकेट
त्यानं विकेट काढलीये सगळ्या खेळांची
आणि खेळखंडोबा होऊन
मी मैदानावरचा भंडारा सोसत
पडद्यावर माझ्या कबड्डीची जेजूरी शोधतीये
मला ती दिसत नाहीये
मी बहुधा कावीळलीये

आणि सचीन तेंडूलकर खेरीज मला काहीच दिसत नाहीये
मी ट्रीटमेंटसारखी चॅनेल बदलतीये

मी झी एमजीएम फक्त रात्रीच लावते
त्यातले नागडे पुरुष मला आवडतात
ते बायकांना काही करू लागतात
आणि शॉट कट होतात
आयुष्यातही असं एडीटींग शक्य असतं तर

प्रत्येक चॅनेल मला पुरुषासारखं वाटतं
बिच्चारं मला आकर्षित करण्यासाठी काय काय करतं ?
आणि मी रिमोटवरील माझी सत्ता कुरवाळत
शीबा राणीसारखी घरात बसते

त्यांना वाटतं ते मला व्यवस्थित हाताळतायत
आणि मी ऑरगॅझमपुरती त्यांना वापरून
ऑफमध्ये सरळ फेकून देते



## इंडिया इज शायनिंग

"इंडिया इज शायनिंग"

सगळेच बूट चेरीब्लॉसमनं चमकतायत
आणि प्रत्येक बूट चार्ली चॅपलीनला आठ आणे देऊन
निघून चाललाय
चॅपलीनचा बूट फाटकाच आहे

फील गूड

सगळेच पुरुष कंडोम घालून बरं वाटून घेतायत
आणि बायका एडस होणार नाही असा फील गुड घेतायत

दिल जीत लो

सगळीच काळीजं डोळ्यात काजळ घालून
विजयवर लाईन मारतायत
आणि विजय दशम्या खाऊन
स्वत:चं गांडीव धनुष्य कुठल्या झाडावर ठेवलं होतं
ते आठवण्याचा प्रयत्न करतोय

सर्वत्र घोषणा होतायत
सर्वत्र जाहिराती पसरतायत
आणि माणसे सिनेमातल्या एक्स्ट्राजसारखी
पन्नास रुपये पर शिफ्ट घेऊन
हिरो हिरॉईन्सचा हेवा करत
शॉट देऊन घरी परततायत

टिव्ही व्हिसीडी सीडी
सर्वत्र फक्त आवाज आहे
आणि माणसांचे गळे मात्र
मस्काकट कापले गेलेत
शांततेविषयी कुणीच काही बोलत नाहीये
ती नेहमीप्रमाणेच आवाजाकडून पराभूत झालीये



**माया**

ह्या मायेला हवेत उधळली
तरीही साऱ्या श्वासात वाहिली
ह्या मायेला आगीत उकळली
तरीही साऱ्या भुकांत तळपली

ह्या मायेचे करू काय सांग
सूर्य आरवतो तेव्हा ही देते बांग

तिच्या मते सर्व प्रकाश तिचाच
ती मावशी अन् सूर्य तिचा भाचाच

दिवसरात्र ही लिहिते कविता
नशेत झिंगते काही न पिता

कशी ही गजब अजब बाई
आयुष्य लिहते ही त्याची शाई

प्रत्येक क्षणी घेते माझीही गाठ
हिला भेटता भेटता वय झाले साठ

मायेतल्या मायेत कित्येक झाले भ्रष्ट
ज्यांना ही उमगली तेही झाले नष्ट

ब्रह्म अमर हीही अमर
तरीही तशी ही आहे निर्मळ
ब्रह्म एखाद्यालाच भेटते
ही मात्र आईसारखी सर्वांशी प्रेमळ

म्हणून म्हणते कविता मायेसारखी असावी
ब्रह्म पुरुषाला ठेवावे बाईने मायाच लावावी.



## ब्र

तुम्ही कितीही गप्प करा
मी तोण्डातून ब्रच काढणार
ब्रह्म
ब्राप्या
आणि ब्राई

तुम्ही कितीही स्तन उघडे मागा
मी स्तनांवर ब्राच घालेन
फारच पुढे आलात तर
आख्खं ब्रह्मांड आठवायला लावेन

माझ्या मौनावर जाऊ नका
मी आता गप्प असले तरी
मी मुकी नाही

माझे ओठ
सद्या ब्रेकफास्ट करण्यात गुंतलेत
एवढंच



## बीच

आख्खी मानवजात चमकतीये आमच्या त्वचेवर
ह्या बीचवर
सर्वचजण सन ऑफ बीचेस
किंवा डॉटर ऑफ बीचेस
किंवा ॲडम आणि ईव्हची सेक्स्युअल सॅण्डविचेस

एक विझक्राफ्ट उभं झालय कुणाच्याही नकळत
समुद्रानं निळं गारूड टाकलय
आणि आख्खी मानवजात बागडतीये
पाण्यात किंवा वाळूत

मी माझा स्कीनटोन बदलतीये सूर्या खाली
आणि माझा मित्र
एफ एमची लाईन पकडण्याचा जोरदार प्रयत्न करतोय

समुद्राच्या काठीही त्याला हवाय दूरवरचा आवाज
लाटाची गाज त्याला ओलांडून माझ्यावर आदळतीये

तो कोरडा आहे
आणि मी ओली

आमची देहबोली टिपून एक कॅमेरा बेशुद्ध पडलाय
त्याला फुंकर मारून उठवण्याचं औत्सुक्यही
नाहीये माझ्या मित्रात

तो कानाला ट्रान्झिस्टर लावून बसलाय
आणि मी संपूर्ण मानवजात ऐकता यावी म्हणून
माझ्या देहाच्या मोबाईलचे
व्हॉल्यूम बार वाढवत बसलीये



## निद्रानाश

एक संत्रस्त डोकेदुखी चालू आहे डोक्यात
एक नीडल वाजवतीये फीडल
कोठल्या रोमचा मृत्यू होणार आहे रोमारोमात
कुणास ठाऊक
आग लागलीये पण मला दिसत नाहीये
डोळ्यांना लागलाय चष्मा बहुधा
रोममध्ये रोमन्स न बनल्याचा कदाचित दुष्परिणाम
किंवा रोमची राणी असूनही रोमची दखल न घेतल्याची सजा

माझ्या डोक्यात कधीचं झोपेचं मांस जळतय
नाक तर चोवीस तास जागं आहे त्याच्या वासानं
ते मला नीट झोपूच देत नाहीये

कधीपासून पांघरूण ओढून पडलीये
आयुष्याच्या चादरबदली हॉटेलात
पण मेली ती झोप काही प्रसन्न होत नाहीये

किती पेनकिलर्स पाठवल्या
पण नीडल लागून साऱ्याचं एनकाऊंटर
नीडलकडं कुठला घोडा आहे कुणास ठाऊक
कदाचित घोडीही असेल
हे कुठलं अंडरवर्ल्ड कनेक्शन आहे
जे मला झोपू देत नाही

सारे हेल्थ डीलर्स हतबल झालेत माझ्या डोकेदुखीपुढे
एकाने तर फीलरही पाठवला
डोके काढून बाजूला झोपेत चालायला शिका
झोपही होईल आणि मार्निंग वॉकही
सकाळी उठून चालायची कचकच राहणार नाही

हे डोके बाजूला काढून ठेवण्याचे टेम्पटेशन लहानपणापासून समोर
कॅडबरीसारखं
बाईचा भुसा करण्याची प्राचीन रीत
पण मी माझ्यातली छोटुकली कधीच ओलांडून गेलीये
जेवण्यापाण्याच्या गप्पा मला जमल्याच नाहीत
आणि भातुकली तर मी कमोडमध्येच ओतून टाकली

आता मी मुक्त झालीये तर ही डोकेदुखी
तिची मेख काही सुटत नाही
फ्रॉईड लाटला
लॅकानला तळला
पण ही मेख आपली तशीच
माझं वजन वाढवत
डोक्यात खिळे ठोकत

मी कधीची अशी जिझससारखी
निद्रानाशाच्या पलंगाला लटकलीये
आणि मला झोपेत उतरवायला कुणीसुद्धा येत नाहीये

ह्या शहरातले सगळे जुजे मरून गेले काय ?



## मॉडेलिंग

काहीच कसं जुळून येत नाहीयं
यश
आयुष्य
तंबोरा
संसार

ह्या इतक्या तारा
आणि इंटरनेटींग कुठंच नाही
केवळ इंटरनॉटींग विदाऊट फ्लो
आणि त्याचा फॉलोअप

कित्येक बिल्डिंग्ज चढवत न्हेल्या
कित्येक इनिंग्ज उभारत न्हेल्या
कित्येक लिंकिंग्ज बांधत न्हेल्या

पण प्रत्येकवेळी लीकेज
आणि ब्रेकेज
लगेज पुन्हा आहे त्या ठिकाणीच

यश चकाकलं
पण सोनं सापडलं नाही

दोस्त प्रतिस्पर्धी झाले
मैत्रिणी कट्यारी
कित्येक सफारी फक्त फोटो पहात संपल्या

बिझनेसच्या जागी बिझनेस राहिला
इझनेसच्या जागी इझनेस

इझिनेस बळी घेत राहिला क्वालिटीचा
आणि चीपनेस
सरकारी भ्रष्टाचारासारखा आयुष्य पोखरत राहिला

आता पुन्हा एक ऑफिस थाटून
बसलीये ह्या बाजारात तर
मनात असलेला रांडेचा फील
काहीकेल्या जात नाहीये

असं वाटतय
एक सार्वजनिक बलात्कार होणाराय माझ्यावर
आणि मी त्याचं व्हिडीओ शूटींग विकून
पैसे कमवणार आहे

किती मुश्किल केलय एका बाईला
इमानानं बिझनेस करणं ह्या सोसायटीनं
कुठे आग तर कुठं फुफाटा
प्रत्येक रॅम्पवर जळत जाणं अटळ आहे.

माझ्यातला बुद्ध नवऱ्यासारखा मरून गेलाय
आणि लोक मला सती न्हेण्याची तयारी करतायत

ढोल वाजतायत
आणि मी
रांड

सती

आणि सीता

अशी त्रिगुणी होत

ह्या बाजारातून मॉडेलींग करत चाललीये

 



स्त्री वाहिनी - ही एका पुरुषाने स्त्रीच्या भूमिकेतून लिहिलेली कविता आहे. महानगरातील समकालीन स्त्रीच्या विविध रूपांचा आणि पर्यायाने स्त्रीत्त्वाचा शोध, हा या कवितेचा विषय. एकीकडे पारंपरिक कुटुंबव्यवस्थेशी डळमळीत होऊ लागलेलं तिचं नातं आणि दुसरीकडे विविध महानगरी व्यवसायात वावरताना विस्तारलेला, विस्तारणारा तिचा पैस असा मोठा पट या कवितेत उभा राहतो. प्रेयसी, बायको, बहिण, आई या तिच्या सगळ्याच भूमिकांचा 'सांस्कृतीक रूपबंध' बदलतो आहे. यातली स्त्री आपल्या शरीराबद्दलच्या न्यूनगंडातून-भयगंडातून मुक्त झालेली आणि लैंगिक संवेदनांना मोकळेपणाने व्यक्त करणारी आहे. तिचे स्वत:ला प्राप्त करून घेण्याचेच ते ऐहिक रूप आहे. स्त्रीच्या आत्मविस्ताराची ही कविता आहे. आणि एका पुरुषाने ती लिहावी, यात मराठी कवितेचाही आपसुकच विकास झाला आहे.

-प्रा. अभिजीत देशपांडे

शब्दवेल